# दक्षिणा

## खुसरूराजाचा इतिहास.

Rollin's life of Cyrus

हा ग्रंथ रोलिन् साहेबानी केलल्या ग्रंथावरून

विष्णु मोरेश्वर भिडे ह्यानीं

मराठी भाषेंत केला,

तो

दक्षिणा प्राइज् कमिटी ह्यानीं पसंद करून

पुण्याचे ज्ञानप्रकाश छापखान्यांत




छापविला.

सन इसवी १८५२

शालिवाहन शके १७७४

9

# प्रस्तावना.

प्राचीन काळीं कोण कोणते लोक उदयास येऊन गेले व त्यानीं कोण कोणतीं कृत्यें केलीं व तीं कोणत्या काळीं के कोणत्या स्थळीं केलीं इतकेंच जर इतिहासापासून समजतें तर त्याचे अभ्यासांत तादृश लाभ नसता व थोर थोर विद्वान लोकांनीही त्याकडे इतकें लक्ष्य दिलें नसतें. वास्तविक पाहतां हें स्पष्टच आहे ज्या गोष्टी होऊन गेल्या व जे लोक मरून गेले त्या विषयींचें ज्ञान स्वरूपतः कांहीं उपयोगी पडतें असें नाहीं. तर त्या गोष्टी समजल्यापासून जो फायदा होतो तो अशा रीतीनें कीं अमुक्यानें अमुक प्रकारचें मूर्खत्व केलें तेणेंकरून अमक्या अमक्या रीतीने त्याचा नाश झाला असें इतिहासावरून समजलें असतां ज्ञाना पुरुष स्वतः तसें मूर्खत्व करीत नाहीं तसें अमुक काळीं अमुक देशीचे लोक मूर्ख दुराचरणी व भिकारी होते तेच लोक पुढें चांगले सुज्ञ सदाचरणी व श्रीमान झाले इत्यादि गोष्टी इतिहासापासून विदित झाल्या असतां जे पुरुष विचारशील तत्वजिज्ञासु असतात ते त्या लोकांची वाईट अव

स्था जाऊन त्यांस चांगली अवस्था आली कशी त्या चीं कारणें सोधून काढून तीं सर्व जगास प्रसिद्ध करितात इत्यादि इतिहासांपासून पुष्कळ उपयोग आहेत.

हा इतिहास रोलिन् नामें फ्रान्स देशांत एक मोठा विख्यात इतिहासकर्ता झाला होता त्यानें फ्रेंच भाषेंत लिहिला त्याचें भाषांतर इंग्रेजी भाषेंत आहे त्याचें आह्मीं मराठींत केलें आहे. सायरसाचा इतिहास रोलिनानें मुख्यत्वेंकरून जेनोफन व हीराडटस ह्या दोन ग्रीस देशांतील इतिहासकर्त्यांच्या ग्रंथावरून केला. रोलिन असें लिहितो कीं ह्या दोघां इतिहासकारांच्या वर्णनामध्यें कोठें कोठें भेद पडतो तेव्हां मी जेनोफनास अनुसरून लिहितों कांकीं जेनोफनास ह्याविषयाची हिराडटसापेक्षां चांगली माहिती होती, कारण अशी प्रसिद्धि आहे कीं, जेनोफन हा धाकटा सायरस ह्मणून जो इराण देशाचा राजा होता त्याच्या पदरीं फार दिवस होता, व त्या राजाच्या सें

त्यांत जे मानकरी सरदार असत त्याशीं हा वारं
वार संभाषण करून त्याच्या रीति भातीची व त्यां
च्या परदेश विजयवृत्तांताची विशेषत: ज्या सैरस
राजानें तें राज्य स्थापिलें व ज्याचाहि इतिहास लि
हिण्याचा त्याचा मुख्योद्देश होता त्याच्या विजयांची
पुरी माहीती करून घेत असे. सायरोपिडिया नामें जो
जेनोफनानें ग्रंथ केला आहे त्यांत तो असें लिहितो
कीं सायरस राजा हा मला मोठा विचित्रपुरुष वाट-
ल्यावरून हा राजा कोणत्या उपायानीं एवढ्या मोठ्या
पदवीस चढला हें मला समजावें ह्या हेतूनें मी तो
कोणत्या कुळांत उत्पन्न झाला व त्याचा स्वभाव कसा
होता व त्यास विद्या कशी प्राप्त झाली इत्यादि अने
क गोष्टींची माहिती मोठ्या आनंदानें करून घेतली.
ह्यास्तव रोलिन् ह्मणतो कीं मी जेनोफनाचे लेखावर
अधिक विश्वास ठेवितों

सीसरो ह्मणून रोमन लोकांमध्यें मोठा प्रसि
द्ध वक्ता झाला होता त्यानें आपल्या भावास लिहिलें
होतें कीं, सायसराचा इतिहास लिहिण्यामध्यें जेनोफ

नाचा उद्देश पाहिला असतां त्याचें राजाचें वास्तविक चरित्र लिहावें असा नाहीं तर उत्तम राज्याचें स्वरूप काय हें वर्णन करण्याचा आहे ह्यावरून त्या ग्रंथकाराचें प्रामाण्य कमी होऊन तो अविश्वसनीय झाला असें नाहीं. तर ह्यावरून एवढेंच दिसतें कीं जेनोफन पंडिताचा उद्देश केवळ इतिहास ल्याहावा एवढाच नव्हता परंतु जेणेंकरून इतर राजांस आप आपल्या प्रजेची प्रीति संपादितां येईल असा एक त्यांस राज्य करण्याचा कित्ता घालून द्यावा असा होता. ह्या हेतूनें त्यानें कधीं कधीं आपल्या मनांतील अर्थाचा बोध करण्या जोगें सैरस राजाचें भाषण वर्णिलें असेल खरें परंतु त्याच्या राज्य संबंधी ज्या मोठमोठ्या गोष्टी वर्णिल्या आहेत त्या सर्व खऱ्या आहेत ह्यांत संशय नाहीं.

---

# अनुक्रमणिका.

# खुसरू नामें इराणी लोकांचा मोठा वि- ख्यात राजा होऊन गेला त्याचा इतिहास.

## अध्याय. १

### खुसरूचा विद्याभ्यास.

खुसरू, ज्यास युरोपियन लोक सैरस* असें म्हणतात. हा शालिवाहनशकाचे पूर्वीं ६७७ वे वर्षीं जन्मला. त्याचा बाप कंबैसिस, हा इराणी लोकांचा राजा होता, व त्याची आई मांदेनी, ही मेदी लोकांचा राजा अस्तैजीस म्हणून होता, त्याची कन्या होती.

त्या वेळेस इराणी लोकांत बारा जाती होत्या व त्या जातींतील एकंदर लोक बारा हजारावर नव्हते. ते लोक त्या काळीं ज्या देशांत राहात असत व ते राहिल्यावरूनच त्यास इराण हें नांव प्राप्त झालें

* खुसरू आणि सैरस हीं दोन्ही नावें एकाच पुरुषास होतीं किंवा दोहों नावांचे दोन पुरुष होते त्याविषयीं अद्यापि निश्चय नाहीं.

नो देश, हल्लीं इराण ह्या नावानें जो मोठा प्रसिध्द देश आहे त्याचा एक प्रांत होता. परंतु खुसरू राजाच्या चातुर्याच्या व पराक्रमाच्या योगानें इराणी लोकांच्या पूर्वेकडे अंमल वाढून ते जसजसे उदयास येत चालले तसतसें इराण हें नाव नव्या नव्या देशांस लागून शेवटीं सिंधुनदीपासून तैग्रीस नदीपर्यंत पूर्वपश्चिम व कास्पियन समुद्रापासून हिंदुमहासागरापर्यंत दक्षिणोत्तर जो मोठा अफाट देश आहे तो सर्व इराण ह्या नांवाखालीं मोडूं लागला. त्याच सीमा इराण देशास अद्यापि आहेत.

खुसरू राजा फार देखणा होता, परंतु बाहेरच्या लावण्यापेक्षां तो अंतःकरणाच्या गुणांवरून लोकांस फार आवडत असे. ते गुण हे कीं, त्याचा स्वभाव फार मनोरंजक असे, त्याचें अंतःकरण सर्वदां दया व सौजन्य ह्यांहींकरून परिपूर्ण असे, त्यास विद्या संपादन करण्याची व यश मिळविण्याची फार हौस असे. यश मिळविण्याचा प्रसंगमात्र असावा मग तें मिळविण्यास

कोणतें कसेंही संकट असो, तो त्यास मोजीत नसे, व त्यांत कोणतीही अडचण असली तरी व कितीही हाल भोगावे लागले तरी तो मागें घेत नसे. त्या वेळेस इराणी लोकांमध्यें मुलांस विद्या शिकविण्याचे नियम व चाली फार उत्कृष्ट असत, त्यांप्रमाणे खुसरू कडून त्याच्या बापानें विद्याभ्यास करविला होता. त्या चाली व नियम, ज्यांची प्राचीन इतिहासकर्ते फार स्तुति करितात ते कोणत्या प्रकारचे होते हें आमच्या वाचणाऱ्यांस कळण्याकरितां त्यांचें संक्षेपेकरून वर्णन करितों.

त्या नियमांचा मुख्य उद्देश हा होता कीं, ह्यांच्या योगानें लोकांचें कल्याण होऊन ते सुखी व्हावे. मुलांकडून उत्तम विद्याभ्यास करविणें हें काम फार अगत्याचें आहे, व राज्य सुरळीत चालण्यास तें प्राणभूत आहे असें ते लोक मानीत असत. आईबापांच्या वेड्याप्रीतीमुळें व लाडांमुळें त्यांच्या हातून मुलांस विद्या शिकविण्याचें काम बराबर होत नाहीं, असें समजून हें काम इराणच्या सरकारानें आपल्या शिरावर घेतलें होतें. सर्व मुलांस

एके ठिकाणीं ठेवून त्यांपासून एकाच नऱ्हेनें विद्याभ्यास सरकार करवीत असें. त्यानीं निरनिराळ्या विद्यांच्या अभ्यास कोठें करावा व केंव ढावेळपर्यंत करावा, त्यानी जेवावें केव्हां व काय व किती जेवावें, व त्यांनीं अमुक अपराध केला असतां त्यांस कोणती शिक्षा असावी, ह्या सर्व गोष्टींविषयीं नियम बांधलेले असत. मुलांस खावयाला भाजीभाकर व प्यायास पाणी इतकेंमात्र मिळत असे. ह्या कायद्यांचा उद्देश हा होता, कीं त्या मुलांस लहानपणापासून मिताहाराची संवय लागावी, व त्यानीं अंमलबाज होऊं नये. त्या खेरीज त्या लोकांस असें वाटत असे कीं साधें व मोतादीचें जेवण जेवलें ह्मणजे तेणेकरून शरीरप्रकृति दृढ होते ती अशी कीं मनुष्य बराच म्हातारा होई तों पर्यंत त्यास लढाईतील कामाचे श्रम सोसण्याची व प्रसंग पडल्यास हाल काढण्याची चांगली शक्ति राहते.

इतर देशांतील मुलें कळाकौशल्य व विद्या शिकण्यास जशीं शाळांत जातात तशी त्या देशांतील मुलें

प्रामाणिकपणा व इतर सद्गुण शिकावयास शाळांत जात असत. व त्या लोकांत अत्यंत घोर अपराध ह्मटला ह्मणजे कृतघ्नता हा असे. इराणी लोकांच्या कायद्यांचा मुख्य मतलब असा असे, कीं रयतेपासून वांकडी गोष्ट मुळींच होऊं देऊं नये कां कीं, त्यांची अशी खात्री होऊन गेली होती कीं, अपराधांबद्दल शिक्षा करावी तीपेक्षां ते मुळींच होऊं देऊं नयेत हें फार चांगलें, आणि इतर राज्यांतील कायदे करणारे जसे गुन्हेगारांस दंड ठरविण्याच्या कामांत वेळ घालवीत, तसें येथील लोक करीत नसत. आपले राज्यांत मुळींच कोणी गुन्हेगार न व्हावा ह्याविषयीं त्यांचा प्रयत्न असे.

सोळा सतरा वर्षांचें वय होई तोंपर्यंत मुलगे मुलांच्या वर्गांत राहात. तेथें ते असतां ते कमान ओढावयास व बर्ची फेंकावयास शिकत. तितक्या वयांत आल्यावर त्यांस उमेदवारांच्या वर्गांत घालीत. तेथें पहिल्यापेक्षां त्यांची बारीक चवकशी असे, व त्यांस विशेष प्रतिबंध असे, कां कीं, त्या वयांत मनुष्य मोह पडून

वि घडण्याचा फार संभव असतो. त्या वर्गांत ते दाहा वर्षें राहत. व तेथें असतां त्यांस श्रम करावयाची संवय लागावी ह्मणून व शहराचा चांगला बंदोबस्त राहवा ह्मणून त्यांस सर्व रात्र पाहारा करावा लागे. त्यांच्या वर जे अधिकारी असत त्यांची त्यांस दिवसास शुश्रूषा करावी लागे, त्यांचे हुकूम ऐकावे लागत, राजा शिकारीस गेल्यास त्याजबराबर जावें लागे, व शिकलेल्या कळाकुसरींचा विशेष अभ्यास करून त्या घटवाव्या लागत.

नंतर ते चांगले वयांत आले ह्मणजे त्यांस तिसऱ्या वर्गांत घालीत. त्या वर्गांत त्यांस पंचवीस वर्षें राहवें लागे. सेनापति पतके व दुसरे सरकारी कामदार नेमणे झाल्यास त्या वर्गांत त्या त्या अधिकारास जे योग्य असत त्यांस नेमीत. आणि पन्नाशी उलटून गेल्यावर स्वदेशाबाहेर लढण्यास जाण्याविषयीं त्यांजवर सरकारचा जोरा नसे.

त्या तीन वर्गांखेरीज एक चवथा वर्ग असे. त्यांत

ढल्या वर्गीत जे फार शाहणे व मोठे वाकबगार असत ते निवडून घालीत. त्यांस प्रधान कीचीं व स्त्रं देऊन त्या पसभेचे मुख्य करीत. अशा उपायांनीं नगरवासी सर्व लोकांस सरकारांतील मुख्य मुख्य जागा मिळविण्याची उमेद राही, परंतु कोणासही वर सांगीतलेल्या वर्गाच्या पाहिऱ्या चढून गेल्याशिवाय व त्या त्या वर्गांत ज्या ज्या विद्या शिकावयाच्या त्या शिकून आंगीं योग्यता आणिल्याशिवाय त्या जागा मिळत नसत. ह्या वर्गांत मुलें पाठविण्यास सर्वांस मोकळीक असे, परंतु ज्या लोकांस आपल्या मुलांनीं काम केल्यावांचून त्यांस पोसण्याची व शाळेचा खर्च चालविण्याची शक्ती असे ते मात्र आपलीं मुलें तेथें पाठवीत.

खुसरू कडून स्वतः ह्या नमुन्यें विद्याभ्यास करविला होता, व त्यानें शिकण्याच्या चाकरींतच केवळ नाहीं तर जें जें काम हातीं घ्यावें तें तें मोठ्या सफाईनें करण्यांत आपल्या वर्तनरीनें सर्व विद्यार्थ्यांस मागें टाकलें.

## अध्याय २

खुसरू राजा आपला आजा आस्तेजीस ह्याचे घरीं गेला व तेथें कांहीं दिवस राहून पुनः इराण देशास परत आला.

खुसरू बारवर्षांचा होता तेव्हां त्याची आई मांदिनी ही त्यास समागमें घेऊन मेदी देशाचा राजा जो आपला बाप आस्तेजीस ह्यास भेटावयास गेली होती. आस्तेजिसानें त्या राजपुत्राच्या बहुत चमत्कारिक गोष्टी ऐकल्यावरून त्यास एकवेळ प्रत्यक्ष पाहावें अशी त्याची फार इच्छा होती. खुसरूनें आज्याच्या दरबारांतील रीती भांती पाहिल्या तों त्या त्यास त्याच्या देशांतल्या रीती भांतीपेक्षां फार निराळ्या दिसल्या. तेथें गर्विष्टपणा, ऐष आरामी, व डौलीपणा हीं अगदीं मी ह्मणत असत. स्वतः राजा आस्तेजीस ह्याच्या आंगावर मोठ्या किमतीचा पोषाक असे, त्याच्या भिंवया चांगल्या कमाणदार करून त्यास व पापण्यांस का

काभोर कलप दिलेला असे, व मस्तकास शोभा येण्या करितां कृतीचे कुरळे केश लाविले असत. हे मेदी लोक बायकांसारखे नटत, ते असे कीं, ते तांबडा पोषाक करीत व हातांत कडीं तोडे व गळयांत कंठ्या वगैरे दागिने घालीत. इराणी लोकांच्या चाली तर अगदीं भिन्न होत्या. ते फार साधे असत व त्यांत मिजाज ह्मणून अगदीं नसे. त्या लोकांची ही छानछोकी पाहून खुसरू काडीमात्रही दिपला नाहीं त्यानें त्या दरबारांत जें जें पाहिलें त्याचे गुणदोष काढिले नाहींत व आपण ज्या रीतीनें वागून लहानाचा मोठा झाला होता तीरीत एथील मोठा डामडौल पाहिला तरी सोडली नाहीं व बाळपणीं गुरूंनीं त्याच्या मनांत ज्या ज्या गोष्टी भरवून दिल्या होत्या त्या त्याच्या मनांतून हालल्या नाहींत. त्यानें आपल्या हुशारीनें व समयोचितभाषणानें आपल्या आज्यास अगदीं मोहित करून टाकलें, व त्यांची वृत्ति उदार व मनोरंजक होती तेणेंकरून तो सर्व लोकांस आवडूं लागला. ह्या विषयीं त्या राजपुत्रा

च्या बहुत गोष्टी ग्रंथकारांनीं लिहिल्या आहेत त्यांपै-
कीं उदाहरणार्थ एक गोष्ट आह्मी एथें लिहितों.

खुसरूची स्वदेशास परत जाण्याची इच्छा हो
ऊंनये ह्मणून आस्तैजिसानें बहुत खर्च करून
त्यास मोठी मेजवानी केली. तींत त्या काळींच्या उत्त-
मोत्तम पक्वान्नांची मोठी चंगळ केली होती. परंतु
तें पराकाष्ठेचें मिष्ट व श्रीमंती जेवण व मोठा थाटाचा
समारंभ पाहून खुसरूस कांहींच अधीक वाटलें
नाहीं. हें पाहून आस्तैजिसास मोठा विस्मय झा
ला. त्यावेळस खुसरू ह्मणाला, आजोबा, आह्मां
इराणी लोकांस भुकचें निवारण करण्याकरितां ए
वढी खटपट करावी लागत नाहीं. आमचा मार्ग फार
सुलभ आहे. थोडीशी भाकर व आह्माळिवांची भा
जी असली ह्मणजे पुरे. तितक्यानें आमचें काम हो
तें. नंतर आस्तैजिसानें त्यास सांगीतलें, कीं मुला
हीं सर्व पक्वान्नें तुझीं आहेत, तुला योग्य वाटेल त्या
कामास हीं त्वां लावावीं. मग अशी सदर परवानगी झा

त्यावरून खुसरूनें तीं राजाची शुश्रूषा करण्याकरि तां जे तेथें कामदार उभेहोतेत्यांस वांटून दिलीं. एका- नें त्यास घोडयावर बसावयास चांगलें शिकविलें हो तें ह्मणून त्यास कांहीं दिलीं दुसरा त्याच्या आज्याची मनापासून शुश्रूषा करी ह्मणून त्यास कांहीं दिलीं. तिस- रा त्याच्या आईची नीट बरदास्त ठेवी ह्मणून त्यास कां- हीं दिलीं. ह्याप्रमाणें कोणास कांहीं कारणावरून को णास कांहीं कारणावरून असें सर्वांस तें उत्तमअन्न थोडें थोडें पोंहोचवीलें. परंतु राजास मद्याचाप्याला प्याला भरूनदेणारा साकस ह्मणून एक मनुष्य होता त्यासमात्र अगदीं कांहीं दिलें नाहीं. त्या साकसाकडे राजास मद्याचा प्यालाभरून देण्याचें काम असून आण- खी एक दुसरें काम होतें. तें असें कीं, कोणास राजापा- शीं कांहीं विनंती करणें असल्यास त्या साकसानें त्याची भेट करून द्यावी असें होतें आणि खुसरूस पाहिजे तेव्हां व पाहिजे तितक्यावेळ राजाची भेट त्या च्यानें करवत नसे, ह्मणून त्या बापडयावर त्या राजपु

ज्याची इतराजी झाली होती, ती त्यानें त्या वेळेस स्पष्ट क- रून दाखविली आसेंजिसाच्या ह्या कुद्देदारावर फा- र क्षोभ होता ह्मणून त्यास राजपुत्रानें अगदींच वगळ- कें असें पाहून त्याबद्दल आपणास कांहीं वाईट वाटलें- सें दाखवीत होत्साता तो ह्मणाला, मुला, हा साकस फार चांगला मनुष्य आहे, हा माझी चाकरी फार हुशारी- नें करितो. हें एकून खुसरूनें उत्तर केलें कीं आजोबा येवढेंच काय, इतक्यानेंच जर आपल्या कृपेचें संपा- दन होत असलें तर ती पाहा बरें मी किती लवकर मि- ळवितों ती. मी जर अधीक शिताफीनें तें काम केलें ना- हीं तर मग मी आपलें नांवच बदलीन. मग तत्क्षणी- च खुसरूनें खिजमतगाराचा पोषाक केला आणि खांद्यावर रुमाल टाकून आणि तीन बोटांनीं तो मद्या- चा प्याला धरून थट्टा अगदीं दिसूं न देतां तो मोठ्या प्रौढतेनें राजापुढें केला. तेव्हां ती त्याची चाकरी व हुशारी पाहून राजा व मांदिनी हीं उभयतां फार खु- ष झालीं. त्यानंतर खुसरू आपल्या आज्याच्या ग

ळ्यांत मिठी घालून आणि चुंबन करून मोठ्या हर्षा-
नें बोलला, हा वेट्या साकसा, आज तुझें घर बुडालें,
आतां तुझी जागा मला मिळेल. आस्तेजीस खुस-
रूस मोठ्या प्रेमानें पोटाशीं धरून ह्मणाला, हे मा-
झ्या लाडक्या बाळा, तूं आज मला फार संतुष्ट केलें.
तुझ्यापेक्षां अधीक कौशल्यानें माझी चाकरी कोणा
च्यानें व्हावयाची नाहीं, पण गड्या, तूं मोठीच एक
गोष्ट विसरलास. ती अशी कीं, तूं तें मद्य मला द्याव
याचे पूर्वीं स्वतः चाखून पाहिलें नाहीं. आणि अशी
चाल होती तरीच, कीं आस्तेजिसास मद्य देण्याचे
पूर्वीं साकस थोडेसें आपल्या डाव्या हतावर पाडून
न तें चाखून पाहून असे. हें ऐकून खुसरूनें उत्त-
र केलें कीं, आजोबा, विसरून ती गोष्ट मी केली नाहीं
असें नाहीं. आस्तेजिसानें विचारिलें कीं, तर मग
तसें न करण्याचें कारण काय? खुसरू ह्मणाला, म-
ला, अशी शंका आली कीं, त्या मद्यांत कांहींतरी
विष असावें. आस्तेजीस ह्मणाला विष! बाळा, तुला

ही शंका कोठून आली? खुसरूनें उत्तर केलें, होय, विषच असतें, आजोबा, कां तर, आपण नुकतीच जी आपल्या दरबारांतील मानकरीलोकांस मेजवानी केली त्या मेजवानींत जे थोर थोरलोक जेवायास आले होते ते हें थोडेसें मद्य प्यायल्याबरोबर अगदीं बेशुद्ध होऊन गेले होते, असें माझ्या नजरेस आलें. आजोबा, त्या दिवशीं तर मोठी मौजच झाली. त्या दिवशीं ते गात काय! व मोठा गलबला काय करीत! व जें काय बोलत तें त्यांचें त्यांसच समजत नसे. आजोबा, तुमचें देखील त्या दिवशीं, मी राजा आहें, हें भान गेलें होतें. व तुमचे मानकरीलोकांस तर, आह्मी प्रजा आहों, अशी स्मृति देखील नव्हतीसें दिसलें. आजोबा, त्या दिवशीं तुह्मांस नाचावेंसें वाटे खरें, पण तुमच्यानें उभें राहवत नसे. आस्तैजीस ह्मणाला, असें तूं आपल्याबापास होतांना कधीं पाहिलें नाहीं काय? खुसरू ह्मणाला, कधीं नाहीं. आस्तैजीस पुसतो कर जेव्हां तो मद्यपान करतो तेव्हां कसें काय होतें? खुसरू ह्मणा-

ला, त्याला प्यावयाचें झालें ह्मणजे तो पाणी पितो, आणि तेणें करून त्याची ताहान भागते, दुसरें कांहीं होत नाहीं.

अंमल करून उन्मत्त होऊं नये ह्मणून त्या गोष्टीमध्यें उपदेश करून इतिहासकारानें जें चातुर्य दारववीलें आहे त्याविषयीं त्याची कितीही स्तुति केली तरी ती त्यास साजायाजोगी आहे. त्या विषयावर मोठ्या प्रौढपणानें पंडितासारखें पांडित्य केलें असतें तर तो तें करावयास समर्थ होता. कारण, जेनोफन* हा मोठा शिपाई होता, ह्मणून विद्वत्तेंत कमी होता असें नाहीं. हा त्याचा गुरु जो साक्रेटीस त्या सारखा महा पंडित होता. परंतु तसें पांडित्य न करितां त्यानें हा सुंदर उपदेश वरील गोष्टींत मोठ्या शब्दांनी मुलाच्या तोंडानें करवून तो सर्वांस समजून रुचेसा केला. ही गोष्ट मुळीं ग्रीक भाषेंत लिहिली आहे, व तेथें ती मोठ्या खुबीनें व पराकाष्ठेचा रस आणून लिहिली आहे.

---

* मूल इतिहासकार

मांदिनी इराण देशास परत जावयास निघाली असतां खुसरू ति च्या बरोबर निघाला नाहीं. कारण कीं, त्याचा आजा त्यास मेदी देशांत राहण्या विषयीं वारंवार फार आग्रह करीत असे यास्तव व तो तेथें घोडयावर बसण्याची विद्या शिकत होता त्या विद्येंत तो पुरा झाला नव्हता ह्मणून त्या गुणाचें संपादन करण्याकरतां तो त्या देशांत कांहीं दिवस राहिला. घोडयावर बसण्याची विद्या शिकण्याची सोय इराण देशांत अगदीं नव्हती, कांकीं, तो देश नापीक व डोंगराळ असा असे, ह्यामुळें तेथें घोडेच तयार होत नसत. खुसरू त्या दरबारांत असतां त्याचें उत्तम आचरण पाहून तेथील सर्व लोकांची पराकाष्ठेची प्रीति त्याजवर जडली, व त्या लोकांत त्याची मान्यताही अतोनात झाली. तो स्वभावतः फार सौम्य, बोलून गोड, मोठा उदार, व दुसऱ्यावर उपकार करावयाचा ह्मटला ह्मणजे ज्यास तिसरा पाय, असा असे. त्या दरबारांतील मानकऱ्यांच्या मुलांस राजापाशीं कांहीं मागणें झालें ह्मणजे ते

खुसरूच्या द्वारें मागत. त्यांनीं कांहीं अपराध केला असें राजास वाटलें असतां खुसरू त्यांच्या बद्दल रदबदली करून राजाच्या मनांतून त्यांजवरचा राग काढून टाकीत असे. त्यांचीं जीं कामें तीं तो आपलीं असें मानून करी आणि तीं अशा चातुर्यानें करी कीं तो जें जें काम हातीं घेई त्यांत त्यास यशच येई.

बाबिलोन शहरच्या राजाचा मुलगा एके दिवशीं बराबर सैन्य घेऊन शिकारीस गेला असतां त्यास वाटलें कीं, आपण मेदी लोकांच्या मुलखांत स्वारी करून आपला शिपाईपणा प्रगट करावा. त्यानें असें केल्यामुळें मेदी लोकांचा राजा आस्तेजीस त्यास त्याजबरोबर युद्ध करावें लागलें. त्यावेळेस खुसरू तेथेंच होता, व त्याची उमर सारी सोळा वर्षांची असतां तो आपल्या आज्याबरोबर युद्धास जाऊन त्याच्या फारच उपयोगीं पडला. त्यावेळीं बाबिलन येथील लोकांचा पराभव होऊन मेदी लोकांस जो जय प्राप्त झाला तो मुख्यत्वें खुसरूच्याच शौर्येंकरून

मास झाला.

ही गोष्ट झाल्यानंतर दुसऱ्या वर्षी खुसरू-ऱ्या बापानें खुसरूस बोलावणें पाठविलें. अशा-साठीं कीं, त्यानें इराण देशांतील कसरतींचा अ-भ्यास आरंभला होता तो त्याकडून संपवावा. खु-सरूही यानें यावयास उशीर लावला असा आपल्या बापानें किंवा आपल्या देशांतील सोबत्यांनीं आपल्या-वर दोष ठेवूं नये ह्मणून निरोप पोहोंचल्याबरोबर स्वदे-शीं परत जावयास निघाला. मेदी लोकांस खुसरू किती आवडत होता हें त्या वेळेस स्पष्ट झालें. हा घरीं जाऊं लागला त्या वेळीं सर्व लहान मोठया प्रतीचे आ-बाल वृद्ध लोक त्यास बोळवावयास आले होते व आस्तेजीस राजा स्वतः घोडयावर बसून आपल्या नात-वास बरोच लांब पोहचवावयास आला होता, आणि जे-व्हां त्यांची परस्पर ताटातूट होण्याचा प्रसंग आला ते-व्हां सर्व दुःखाश्रूंनीं न्हाऊन गेले.

नंतर खुसरू आपल्या देशीं येऊन मुलांच्या

वर्गांत पुनः आपलें नांव प्रविष्ट करून तेथें एक वर्षभर राहिला. त्याच्या सोबत्यांस असें वाटत होतें कीं, मेदी लोक फार विषयलंपट व मिजाजखोर आहेत, त्यांच्या दरबारीं खुसरू इतक्या दिवस राहिला तेंव्हां त्याच्या चालचर्येंत कांहीं फेरफार झाला असेल, परंतु त्याच्या नेहमीच्या जेवणानेंच त्याचें समाधान होत आहे व एकादेवेळेस मेजवानी झाल्यास इतर सर्व मंडळीपेक्षां खाण्यापिण्यांत त्याचा विशेष नेमस्तपणा आहे, असें पाहून त्यांस फारच संतोष व आश्चर्य वाटलें.

त्या वर्गांतून तो उमेदवारलोकांच्या वर्गांत गेला. तेथें तो असतां लवकरच असें दिसून आलें कीं हुशारी, आटोप, सहनशीलता व आज्ञाधारकपणा ह्या गुणांत त्यासारखा दुसरा कोणी नाहीं.

पुढें दाहा वर्षांनंतर त्यास प्रौढलोकांच्या वर्गांत घातलें. तेथें तो तेरा वर्षें होता त्या मुदतीच्या शेवटीं तो इराणी लोकांचें सैन्य घेऊन आपला मामा सी

याकसरीस मेदी लोकांचा राजा त्याच्या कुमकेस गेला.

## अध्याय ३

### खुसरूची पहिली मोहीम.

शालिवाहन शकाचे पूर्वीं सुमारें ६३८ वे वर्षी मेदी लोकांचा राजा आस्तेजीस मरण पावल्यावर त्याच्या मागें त्याचा पुत्र सियाकसरीस राज्य करूं लागला. हा नवा राजा सिंहासनारूढ मात्र झाला इतक्यांत त्यास युद्ध करण्याचा प्रसंग उपस्थित झाला. त्यास अशी बातमी लागली, कीं बाबिलोनियन लोकांचा राजा नेरिग्लिसर आपणांशीं लढाई करण्यासाठीं मोठी जबर फौज तयार करीत आहे; व त्यानें लीडिया देशाचा राजा क्रिजस वगैरे कितीएक राजे आपल्या पक्षास अनुकूल करून घेतले आहेत; व आणखी त्यानें इराणी लोकांविषयीं व मेदी लोकांविषयीं हिंदुस्थानचे राजांच्या मनांत वांकडें भरवून देण्याकरितां त्यांकडे आपले वकील पाठवून त्यांस असें समजावि

लें आहे कीं इराणी लोक व मेदी लोक हे आधींच मोठे जबरदस्त आहेत त्यांत ह्या उभयतांचें परस्पर विशेष सख्य झाल्यापासून आपणांस मोठा अपाय घडेल, ह्यास्तव ह्या वेळेस सर्वांनीं मोठ्या नेटानें लढाई करून त्याचें सामर्थ्य दिवसानुदिवस वाढत आहे त्यास प्रतिबंध केला तर चांगली गोष्ट आहे. नाहीं तर ते शिरजोर होऊन भोंवतालच्या सर्व राजांस जेरदस्तींत आणतील. सीयाकुसरीस राजास ही बातमी समजल्यावर त्यानें कुमक मागण्याकरितां कंबेसीस राजाकडे वकील रवाना केले, आणि त्यांस सांगितलें कीं कंबेसीस जी फौज पाठवील तिचा सरदार खुसरू होऊन येईल अशी तजवीज करा. कंबेसीस राजानें हें त्याचें ह्मणणें मोठ्या संतोषानें स्वीकारलें. मग खुसरू सेनाधिपति होणार असें समजतांच सर्वांस मोठा आनंद झाला. कंबेसीस राजानें जी फौज पाठविली ती ३०००० होती, तींत घोडेस्वार एकदेखील नव्हता, सर्व पाय-

द्ब होतें खरें पण ते तितकेही लोक निवडक होते. व सर्व वर सांगितले त्या रीतीनें तरबेज केलेले होते. खुसरूनें मुळारंभीं मानकरीमंडळींतून अत्यंत शूर असे दोनशें कामगार निवडून काढले आणि त्यांतील प्रत्येकास त्याचप्रतीचे आणखी चारचार असामी निवडून काढावयास हुकूम केला. ह्याप्रमाणे सर्व मानकरीलोक एकंदर १००० झाले. हेच मानकरी पुढें खुसरूनें जे शत्रूबरोबर मोठेमोठे युद्धप्रसंग केले त्या सर्व प्रसंगी उत्तम प्रकारें लढून मोठ्या नांवरूपास चढले. या १००० लोकांस पुनः अशी आज्ञा झाली होती कीं, तुह्मीं एकेकानें दाहा बर्चीवाले, दाहा गोफणगुंडेवाले, व दाहा तिरंदाज असे तीसतीस मनुष्य जमवावे. ह्याप्रमाणें सर्व मिळून ३१००० फौज झाली.

वर सांगितलेले दोनशें असामींस निवड करण्याच्या कामास लावण्याचे पूर्वीं नेमून दिलेलें काम करण्यास त्यांस उत्साह येण्यासाठीं त्यांशीं कांहीं

मनोरंजक संभाषण करावें असें खुसरूस वाटून त्यानें त्यांच्याशीं हें पुढील संभाषण केलें. त्या भाषणांत त्यानें प्रथमतः त्यांची शूरपणाविषयीं मोठी वारवाणणी करून ह्या पुढील लढाईंत आपला विजय होऊन आपणांस यश येईल असा त्यांच्या मनांत पूर्ण भरंवसा उत्पन्न केला. तो त्यांस ह्मणाला, मित्रांनो, आतां आपली ज्या शत्रूंशीं गांठ पडावयाची आहे ते कोणत्या प्रकारचे आहेत हें तुह्मांस विदित आहे काय? ते लोक अगदीं नरम, जनानी व दुर्बळ आहेत. विषयलंपटपणानें व मिजासीपणानें त्यांस आधीं निमेंजेर करून टाकलें आहे, त्यांस ताहान भूक काढण्याचें सामर्थ्य नाहीं, त्यांना लढाईचे श्रम निघावयाचे नाहींत, व वेळ गुदरली असतां त्यांच्यानें नेट धरून राहावयाचें नाहीं, अशी त्यांची अवस्था आहे. आतां तुह्मी कसे आहां ह्मटलें ह्मणजे, बाळपणापासून मोनादीनें खाण्यापिण्याविषयीं व हाल काढण्याविषयीं अगदीं घटून गेलां आहां. तुह्मांस ताहान भूक ह्मटली ह्मणजे केवळ

तोंडीं लावण्याप्रमाणें आहे आणि खरोखरी तुमच्या जेवणास रुचि आणण्यास ताहान भूकेवांचून दुसऱ्या चटण्या कोशिंबिरी नाहींत. श्रम करावयाचे ह्मटलें ह्मणजे तुह्मांस तिसरा पाय, व जोरवीस अंगावर घेण्याचा मोटा आनंद, आणि कोणतीही गोष्ट करण्याविषयीं तुमच्या मनांतला हेतु ह्मटला ह्मणजे स्वदेशकल्याण, व कीर्तिसंपादन हाच होय. ह्याखेरीज, तुमचा पक्ष वाजवी आहे हीही एक गोष्ट तुह्मांस मोठी अनुकूळ आहे. तुमच्या शत्रूंनीं आगळीक केली आहे, तुह्मीं केली नाहीं. ते होऊन तुह्मांवर चालून आले आहेत, व तुह्मीं आपल्या मित्रांस कुमक करण्याकरितां युद्धास प्रवृत्त झालों आहां. दुसरे आपणास उगीच उपद्रव देऊं लागले असतां त्यांचें निवारण करणें हें न्यायास विरुद्ध आहे कीं काय? व आपल्या मित्रांस साहाय्य करण्याकरितां धांवून जाण्यासारखें दुसरें कांहीं कीर्तिप्रद आहे काय? आतां हीं सर्व कारणें असोत, परंतु ह्या लढाईंत आपली कार्यसिद्धि होईलच अ-

सा दृढ विश्वास धरण्याचें प्रथमतः मुख्य व योग्य कारण हें आहे कीं, मी देवांचें अनुमोदन घेऊन आपलें त्यांनीं संरक्षण करावें ह्मणून त्यांची प्रार्थना करून त्या कामांत पडलों आहें. कां कीं, माझी चाल तुह्मास ठाऊकच आहे, कीं ही गोष्ट केल्यावांचून मी कोणतीही गोष्ट करीत नाहीं व कोणत्याही कामास हात घालीत नाहीं.

नंतर खुसरू वेळ फुकट न घालवितां शालिवाहन शकाचे पूर्वीं ६३५ वे वर्षांत निघून चालू झाला. परंतु घरांतून बाहेर पडण्याचे पूर्वीं त्यानें देवांचा आणखी एक वेळ धांवा केला. कां कीं, त्याच्या बापानें त्याला एक उत्कृष्ट गोष्ट शिकविली होती व तोही ती गोष्ट मोठी मानीत असे. ती गोष्ट अशी कीं, मनुष्यास लहान मोठें कसेंही काम करणें झाल्यास तें त्यानें देवांचें अनुमोदन घेतल्यावांचून व त्यांनीं आपलें संरक्षण करावें ह्मणून त्यांची प्रार्थना केल्यावांचून करूं नये. त-

सेंच कंबैसीस त्यास वारंवार असा उपदेश करीत असे कीं, मुला, विचार करून पाहा, कीं आपणामाणसांचें शाहाणपण फार थोडें आहे व आपली दृष्टि कोती आहे, ती पुढें काय होईल हें जाणण्याविषयीं अगदीं असमर्थ आहे बहुत वेळ असें घडतें कीं, ज्या गोष्टी पासून आपलें कल्याण व्हावेंच असें आपणास वाटत असतें त्याच गोष्टीपासून आपला नाश होतो, अशी आपणामनुष्यांची अवस्था आहे. परंतु देव जे आहेत ते सर्वज्ञ आहेत. पुढें होणाऱ्या व मागें झालेल्या सर्व गोष्टी त्यांस समजतात. आणि जें आपल्या भक्तांस अत्यंत हितावह असतें तेंच करण्याविषयीं ते त्यांस बुद्धि देतात. आतां अशी बुद्धि देणें हाच त्यांचा प्रसाद व हेंच संरक्षण होय. हीं करण्याविषयीं ते कोणाचे बांधील नाहींत. जे त्यांचा धांवा करतात व त्यांचें अनुमोदन घेतात त्यांसच त्यांपासून तीं प्राप्त होतात.

कंबैसीस इराण देशाच्या सीमेपर्यंत आपल्या मुलास पोहोंचवायास गेला होता, आणि वाटेनें त्या-

नें त्यास सेनापतीचीं आवश्यक कर्मे कोणतीं ह्यांचा उपदेश केला. त्या काळचे जे महान् महान् समर्थ पंडित होते त्यांच्या हातांखालीं खुसरूनें विद्याभ्यास केला होता, त्यावरून त्यास वाटत असे कीं, आतां लढाईतील गोष्टींविषयीं ह्मणून आपणास अज्ञान राहिलें नाहीं. कंबेसिसानें आपल्या पुत्रास असें विचारिलें, कीं मुला, प्रसंग पडला असतां सैन्यास अन्नपाण्याचा पुरावा कसा करावा, रोग उत्पन्न झाला असतां त्याचें निवारण कसें करावें, शिपाईलोकांचें आरोग्य कसें राखावें, वारंवार कसरती करून त्यांचीं शरीरें कशीं दृढ करावीं, त्यांच्यामध्यें उत्तमप्रकारची ईर्ष्या कशी उत्पन्न करावी, व ते आपला हुकूम मानतील, आपला सन्मान ठेवतील व आपल्यावर प्रीति करतील असें कसें करावें, ह्या गोष्टी तुझ्या गुरूनें तुला शिकविल्या आहेत काय? ह्या आणि दुसऱ्या कितीएक गोष्टी कंबेसीस राजानें खुसरूस विचारल्या, परंतु त्यानें असें उत्तर केलें कीं, म्या आपल्या गुरूंच्या नोंडून ह्या गोष्टींविषयीं एक च-

कार शब्द देखील ऐकिला नाहीं. मग राजानें विचारिलें, मुला, तर तुला गुरूंनीं काय शिकविलें? खुसरू ह्मणाला, त्यांनी मला दांड पट्टा कसा खेळावा, बाण कसे मारावे, बर्ची कशी फेंकावी, फौजेचा कोट कसा बांधावा, दुर्गांचे प्रकार किती कसे, लढाईच्या वेळेस पायदळाचा व्यूह कसा करावा, त्यांची देखरेख कशी करावी, त्यांच्याकडून कवाईत कशी करवावी. त्यांच्या रांगा कशा तोडाव्या व छावणी कशी द्यावी ह्या सर्व गोष्टी शिकविल्या आहेत. हें ऐकून कंबैसीस हांसला, आणि ह्मणाला, हुशार सेनापतीस ज्या गोष्टी अवश्य समजल्या पाहिजेत त्यांपैकीं त्यांनी तुला एकही शिकविली नाहीं. मग कंबैसिसानें खुसरूशीं संभाषण करून त्यास ज्ञान प्राप्त करून दिलें, तें मोठ्या मोठ्या विख्यात पंडितांनीं बहुत वर्षें घालवून जी विद्या त्यास शिकविली होती तीपेक्षां फारच अधीक होतें. हें संभाषण ज्यांस लष्करी काम करावयाचें असेल त्यांस चांगला अभ्यास करून शिकण्यास

योग्य आहे. त्या संभाषणाचा कांहीं अंश अली खालीं लिहितों त्यावरून आमच्या वाचणाऱ्यांस बाकीच्या भाषणाच्या योग्यतेचें अनुमान करता येईल.

कंबैसिसानें खुसरूस जे प्रश्न केले त्यांत हा एक प्रश्न होता कीं, शिपायांनीं सेनापतीचे हुकूम अनन्य भावें मानावें त्यास उपाय कोणता? खुसरूनें उत्तर दिलें कीं त्याविषयीं सुलभ व निश्चित उपाय हाच दिसतो, कीं जे शिपाई हुकूम बरोबर मानतील त्यांची स्तुति करून त्यांस इनामें द्यावीं, व जे सांगितलेलें काम करायास चुकावतील त्यांची निर्भर्त्सना करून त्यांस शिक्षा करावी. कंबैसीस ह्मणाला, मुला, तूं ह्मणतोस तें खरें पण हा मार्ग बलात्कारें करून आपला हुकूम मानविण्याचा होय. परंतु मुख्य गोष्ट ही आहे कीं, सेनापति जें सांगेल तें त्यांनीं सुखासंतोषानें ऐकावें, त्याबद्दल त्यांवर जुलूम करणें पडूं नये. आणि ही गोष्ट घडवून आणण्याची निश्चित रीति हीच होय कीं ज्यांवर आपला हुकूम चालत असेल त्यांची अशी खात्री करून द्यावी, कीं

आमचें कल्याण कसें होईल हें आमच्यापेक्षां आमच्या अधिकाऱ्यास चांगलें समजतें. कां तर यावत् मनुष्यांचा स्वभाव असा आहे, कीं ज्यास ते आपणांपेक्षां शाहाणा समजतात त्याचें ते मोठ्या संतोषानें ऐकतात, व त्याचे वशवर्ती होतात. पाहा बरें रोगी वैद्यावर, वाटसरू वाटाड्यावर, व तारवांतील उतारकरू मनुष्यें नावाड्यावर डोळे झांकून विश्वास ठेवून ते जें जें सांगतील तें तें ऐकतात. ह्याचें बीज हेंच आहे कीं, रोग्यादिकांचा वैद्यादिकांवर असा पक्का विश्वास असतो कीं वैद्य वगैरे आपल्या कामांत आह्मांपेक्षां विशेष कुशल आहेत, त्या कामांत त्यांची माहितगारीही आमच्यापेक्षां चांगली आहे. **खुसरूनें** आपल्या बापास प्रश्न केला, कीं आपण एकाद्या कामांत लोकांपेक्षां कुशल व हुशार आहों असें दाखविण्यास मनुष्यानें कोणती तजवीज करावी? बापानें उत्तर दिलें, कीं त्यास तजवीज एकच आहे, ती ही कीं, आपण खरोखरींच तसें असावें आणि तसें होण्यासाठीं त्या मनुष्यानें तें काम शिकण्यांत नेहेमीं चूर होत असावें. त्यांतील नेम अस-

तील त्यांचा जीव लावून व्यासंग करावा. त्यांत अत्यंत दक्ष व वाकबगार जे असतील त्यांचे त्या विषयींचे विचार समजून घ्यावे. सारांश जें काम आपण हातीं घेतलें त्याची सिद्धि होण्यास जें जें साधक आहे तें तें करण्यास कधीं उपेक्षा करूं नये. आणि सर्वांवर ही गोष्ट कीं, त्या मनुष्यानें त्या कामांत आपणास सिद्धि होण्याकरितां सर्व काळ देवाची प्रार्थना करीत असावें. कांकीं, आपणास शाहणपण व यश देणारा त्याच्या वांचून दुसरा कोणी नाहीं.

मग खुसरू मेदी देशांत दाखल झाला. त्याची व सीयाकुसरिसाची गांठ पडून त्यांच्या चालीप्रमाणें आदर सत्कार झाल्यावर त्यानें पहिल्यानें उभयपक्षांच्या फौजा किती आहेत, कोणत्याप्रकारच्या आहेत त्याचा शोध केला, आणि हिशेब करून पाहिलें तों शत्रूच्या फौजेंत २००००० दोनलक्ष पायदळ व ६०००० नव्वद हजार घोडेस्वार भरले आहेत, आणि इकडे मेदी लोकांच्या व इराणी लोकांच्या सैन्यांत मिळून सरासरी शत्रूच्या निमेनें पायदळ होतें न होतें, आणि घोडेस्वार तर

त्यांच्या जवळ जे होते त्यांचा तिसरा वांटा सुद्धां यांच्या जवळ नव्हते. नंतर शत्रूंच्या सैन्यांस व आपल्यासैन्यांत संख्येचें हें मोठें अंतर पाहून सीयाक्सरीस राजास पराकाष्ठेचें भय वाटून तो मोठ्या विचारांत पडला. त्यास दुसरी कांहीं तजवीज सुचेना. एकच तजवीज सुचली. ती ही कीं, इराण देशाची जी फौज येऊन दाखल झाली आहे तिजपेक्षां पुष्कळ अशी आणखी फौज निरोप पाठवून त्या देशांतूनच आणवावी. परंतु विचार करून पाहतां त्या गोष्टीस वेळ फारच लागणार व ही गोष्ट दुःसाध्य असें दिसलें. मग खुसरूनें एक तजवीज योजिली, ही पहिली पेक्षां निश्चित व झटपटीची होती. ती अशी कीं, इराणी शिपायांचीं हत्यारें बदलावीं, ते शिपाई तिरंदाज व बर्चीवाले असत, तेणेंकरून त्यांस दुरून लढावें लागें आणि ह्या प्रकारच्या लढाईंत ज्यांच्या जवळ सैन्य जास्ती असे त्यांचा वरचढ होई ह्यावरून खुसरूची मसलत अशी होती कीं, शिपायांजवळ अशीं शस्त्रें असावीं कीं, लढाईस प्रारंभ होण्याबरोबर त्यांस शत्रूंशीं हातघाईस ये-

णें अवश्य पडेल आणि असें केलें असतां शत्रूंस पुष्कळ सैन्य असून जे लाभ व्हावयाचे ते होणार नाहींत. ही युक्ति सर्वांनीं पसंत केली आणि त्याप्रमाणें त्यांनीं केलें.

खुसरूनें सैन्यांत चमत्कारिक व्यवस्था केली, व मोठमोठाली बक्षिसें शिपायांस कबूल करून व त्या सर्वांशीं मोठ्या गोडीगुलाबीनें वागून त्यांच्यामध्यें विलक्षण ईर्ष्या उत्पन्न केली. जवळ पैसा असला ह्मणजे लोकांवर उपकार करतां येतो ह्मणूनमात्र पैका थोर असें त्याचें मत असे. तो सर्वकाळ कोणाला नाहीं, तरी त्यांच्या योग्यतेप्रमाणें व पदवीप्रमाणें कोणाला ढाल कोणाला तरवार अशा नजरा देत असे. तो असें मानीत असे कीं, सेनापतीनें आपलें सेनापतित्व कांहीं विलक्षण चिन्हांनीं दाखवावयाचें तें उत्तम अन्न सेवन करून व उंचीं उंचीं वस्त्रें अंगावर घालून दाखवूं नये. आपल्या औदार्यानें व परोपकारबुद्धीनें दाखवावें. आणि तें उरमठपणानें दाखविणें हा तर सर्वथा मूर्खपणा आहे. तो ह्मणे सेनापतीस, धन देण्यानें आपलें अंगचा थोरपणा सर्वांस दाखवितां

येत नाहीं. ह्याकरितां त्यानें आपल्या आचरणानें आपल्या मनांत त्यांचें बरें करण्याची इच्छा आहे, आपण त्यांवर प्रसन्न आहों, अशी सर्वांची खातरी करावी. कां कीं, ह्यांत मोठें शाहणपण आहे. पाहा तो जर नजरा देऊं लागला तर त्याचे जामदारखानें रिकामे होऊन जातील, आणि तसें करूनही कदाचित् सर्वांस त्याच्या हातून नजरा पोंहचणार नाहींत. परंतु तो जर सौजन्येंकरून व परोपकारबुद्धीनें वागला तर तेणेंकरून त्याचा अगदीं तोटा नहोतां त्यावर सर्वांची प्रीति बसेल व त्यापासून सर्व संतोष पावतील.

एके दिवशीं खुसरू आपल्या फौजेची देखरेख करीत असतां त्याजकडे सीयाकुसरीस राजाकडून एक जासूद येऊन त्यानें त्यास सांगितलें कीं, हिंदुस्थानच्या राजांकडून वकील आले आहेत, त्याकरितां राजानें आपणास जलद सभेस बोलाविलें आहे व महाराजांनीं आपणास हा उंची पोषाक पाठविला आहे, आणि सरकाराची मर्जी अशी आहे कीं, हीं भव्य वस्त्रें आंगावर घेऊन

हिंदुस्थानच्या लोकांस भेटावें, ह्मणजे त्यांस मान दिलासा होईल. हा निरोप ऐकिल्यावर खुसरू क्षणभर वेळ न घालवितां आपल्या फौजेसकट निघून राजाच्या खिस-मतीस हजर झाला, पण त्यानें राजाच्या सांगण्याप्रमाणें पोषाक बदलला नाहीं. पहिला इराण देशाच्या चाली-चा साधा पोषाक जो त्याचे आंगावर होता तोच होता. तें पाहून सियाक्सरीस राजास प्रथमतः थोडासा राग आला, परंतु खुसरू ह्मणाला महाराज मी आपल्या निरोपाब-रोबर तावडतोब निघून तोंड घामाघूम होई तों सपाट्या-नें आपल्या सेवेस दाखल झालों. त्यावरून आह्मी आ-पला हुकूम किती त्वरेनें बजावतों हें सर्व लोकांस समजे-ल. तर असें करण्यानें आपला जितका थोरपणा दाख-विला, त्यापेक्षां मीं जर आरंभींच पोषाक करून व कंठ्या चौकडा कडीं तोडे वगैरे दागिने आंगावर घालून खोळंबा केला असता तर आपणास अधीक थोरपणा दिलासें हो-तें काय?

हें उत्तर ऐकून सीयाक्सरीस फार खुषी झाला,

आणि हिंदुस्थानाच्या वकिलांस आंत येऊंद्या ह्मणून त्यानें सांगितलें. त्या वकिलांच्या बोलण्याचा सारांश येणें प्रमाणें होता. ते ह्मणाले, आमच्या सरकारानें आह्मांस मेदी लोक व बाबिलनांतील लोक ह्यांच्यामध्यें सांप्रत जो कलह उत्पन्न झाला आहे त्याचें कारण काय हें समजून घेण्याकरितां पाठविलें आहे, आणि महाराजाचा सर्व मजकूर समजून घेतल्यानंतर बाबिलनास जाऊन तेथील राजा स्वपक्षसाधक कारणें जीं सांगेल तीं ऐकून घेऊन यावें अशी आह्मांस आज्ञा आहे. कारण कीं, आमच्या सरकाराचा मनोदय असा आहे, कीं दोहीं पक्षांचें बोलणें ऐकून घेऊन जो पक्ष वाजवी असेल तो आपण स्वीकारावा. आंगीं मोठी शक्ति असतां ती अशा कामास लावणें हेंच उदारपुरुषांस कीर्तिकारक व योग्य होय. अशा पुरुषांस सत्पक्षावांचून दुसऱ्या कशाची भीड पडत नाहीं. आणि ते भोंवतालच्या राष्ट्रांमध्यें फूट पडून तंटा लागला असतां त्यापासून आपलें कांहीं हित करून घेण्याचा उद्देश न धरितां वाजवी पक्षाचा अवलंब करून अगळीक करणाऱ्याचे उघड शत्रु होता-

त. खुसरू व सियाकुसरीस यांनीं उत्तर दिलें कीं, आह्मीं बाबिलोनियन लोकांचा कांहीं अपराध केला नाहीं आणि हिंदुस्थानचा राजा आमचा तंटा तोडण्यास मध्यें पडला असतां आह्मांस फार संतोष होईल. पुढील वृत्तांतापासून असें दिसतें कीं त्या राजानें मेदी लोकांचा पक्ष स्वीकारला.

आर्मीनिया ह्मणून एक प्रांत आहे तेथील राजा हा मेदी लोकांचा ताबेदार होता, त्यानें ह्या प्रसंगीं बाबिलोनियन लोकांनीं वगैरे मेदी लोकांवर चढून जाण्याचा जो बेत केला आहे तेणेंकरून मेदी लोक लवकर बुडतात. असें पाहून असा विचार केला कीं, ह्या लोकांची ताबेदारी टाकून आपणास स्वतंत्र व्हावयास ही सवड फार चांगली आहे ही आपण व्यर्थ जाऊं देऊं नये. नंतर त्या लोकांस मिदियाचे राजाला कांहीं खंडणी द्यावी लागत असे व लढाईच्या समयीं कांहीं फौजेची कुमक करावी लागत असे, ती खंडणी वगैरें कांहीं आह्मी देत नाहीं ह्मणून त्यांनीं मेदी लोकांस साफ सांगितलें. हें पाहून सियाकुसरीस मोठ्या

पंचाइतींत पडला. त्यास असें भय वाटलें कीं, आपण आ-र्मीनियन लोकांस बळात्कारानें तहाप्रमाणें वागण्यावि-षयीं तसदी देऊंलागलों तर ह्या अशा संधीस आपणआ-पणास नवे शत्रु केलेसें होईल. ह्याप्रमाणें राजाचीतरअ-क्कल गुंग झाली. मग खुसरूनें आर्मीनिया देशाचीव तेथील सैन्याची वगैरे माहितगारी करूनघेऊन आप-ल्या मामास सांगितलें कीं, आपण ह्या कामाविषयीं तिळ-मात्र चिंता करूं नये. हें मजकडे लागलें. खुसरूनें म-नांत जी मसलत योजिली होती तींत हीच मोठी खुबी हो-ती, कीं ती अगदीं फुटूं नये. नाहींतर ती कदाचित फसेल. ह्यास्तव त्यानें आर्मीनिया देशाच्या अंगास बहुत लो-क घेऊन शिकारीस जाण्याचा बेत केला. असा बेत कर-ण्याचें कारण हें होतें कीं, आपण सैन्य घेऊन निघालों ह्मणून आर्मीनियाचे राजास कांहीं संशय येऊंनये. पूर्वीं घोडयास फेरफटका करावयास त्या बाजूसजाऊ-न तेथें आर्मीनीयाच्या राजाचा पुत्र व त्या देशांतील मानकऱ्यांचे उमेदवार मुलगे ह्यां सहवर्तमान पारध

करावयाचा खुसरूचा पाठ होता. मग ठरव केल्या दिवशीं तो मोठ्या स्वारीनिशीं शहराबाहेर पडला. त्यानें बरोबरच्या लोकांस हुकूम केला कीं, तुह्मीं माझ्या मागून कांहीं अंतरावर चालावें व इशारा झाल्याशिवाय पुढें येऊं नये. मग खुसरूनें कांहीं दिवस पारध केली आणि आर्मीनियाच्या राजाच्या वाड्याचे बरेच जवळ आपण आलोंसें पाहून त्यानें आपली मसलत आपल्या जवळच्या कामगारांस कळविली, व कीजाटस नामें एक कामगार होता त्यापाशीं शिपायांची एक टोळी देऊन त्यास त्या देशांत एक बिकट चढणीचा किल्ला होता त्याचें नांव सांगून तो किल्ला तुह्मीं सर करून घ्यावा असा हुकूम करून तिकडे पाठविलें. खुसरूस माहित होतें कीं, कांहीं संकट गुदरलें असतां राजा आपल्या कुटंबासुद्धां त्या किल्लयांत जाऊन राहत असतो. हें झाल्यानंतर खुसरूनें त्या राजाकडे वकील पाठवून त्यास तहनाम्यांत लिहिलेल्या कलमांचा उलगडा करावयास बोलाविलें, आणि त्याच वेळेस आपल्या फौजेस पुढें जा-

वयास हुकूम केला. त्याप्रसंगीं खुसरूनें आपणास मोठे चातुर्यानें वेढलेंसें पाहून आर्मीनियाचा राजा अगदीं भांबावून गेला. त्यास कांहीं सुचेनासें झालें. आपण अपराधी आहों असें त्याचें मन त्यास सांगूं लागलें, व आपला बचाव करण्याचा उपाय त्याजवळ कांहीं राहिला नव्हता. तथापि होता तितका प्रयत्न करून त्यानेंच हूं कडून फौज गोळा केली. व त्याचवेळीं आपला अगदीं धाकटा मुलगा सिपारीस ह्यास आपल्या बायका व मुली व जवाहीर वगैरे अत्यंत मोल्यवान पदार्थ जे होते ते घेऊन वर सांगितलेल्या किल्ल्यांत जावयास सांगितलें.

खुसरू फार जवळ आला असें पाहून तर त्याचें अगदीं धैर्य सुटलें, आणि तो आपलें संरक्षण करण्याचे सर्व विचार विसरला. हें पाहून आर्मीनियांतील लोकांची त्याप्रमाणेंच अवस्था झाली आणि ज्यास जें अत्यंत प्रिय तें तो घेऊन जिकडे वाट फुटली तिकडे पळूं लागला तेव्हां सर्व देशभर जिकडे तिकडे लोक पळत सुटले असें पाहून खुसरूनें त्या लोकांस अ-

सें सांगून पाठविलें कीं, तुह्मीं जर आपआपल्या घरांत रा हाल आणि पळून जाणार नाहीं, तर तुह्मांस मजपासून तिळमात्र धक्का लागणार नाहीं, पण जे पळतांना सांपडतील त्यासमात्र मी शत्रुवत् मानीन. हें ऐकून जे लोक राजाबरोबर गेले तेवढे वेगळे करून सर्व लोक आपआपल्या घरीं गेले.

आतां इकडे जे लोक राणी वगैरे यांस घेऊन किल्ल्याकडे जात होते ते कीजाटस दबा धरून बसला होता त्याच्या हातीं सांपडले. त्यांपैकीं त्यानें बहुत लोकांस कैद केलें. त्याप्रसंगीं आर्मीनिया देशाच्या राजाची बायको मुलगा मुलगी व वडील सून हीं सर्व इराणी लोकांच्या हातीं सांपडलीं. ह्या खेरीज त्यांच्या हातांत बहुत पैकाही लागला.

आर्मीनियाचे राजानें हें दुःखकारक वर्तमान ऐकिल्यावर आपला पुढें काय परिणाम होईल हें त्यास कळेनासें झालें. तेव्हां तो एका लहानशा टेंकडीवर जाऊन बसला, परंतु तत्काळ त्या टेंकडीस इराणी लोकांनीं

वेढा घातल्यामुळें त्यास लवकरच त्यांच्या हस्तगत होणें भाग पडलें. खुसरूनें आज्ञा केली कीं, राजास कुटुंबासुद्धां सभेंत आणावें. आर्मीनि याचे राजाचा वडील पुत्र दायग्रेनीस हा दूरदेशीं प्रवासास गेला होता तोही इतक्यांत तेथें आला, आणि आपल्या बापाची अशी अवस्था पाहून त्यास मोठा गहिंवर आला. आणि तो रडूं लागला. तेव्हां खुसरू त्यास ह्मणतो, मुला, तूं बरा वेळेवर आलास. आतां तुझ्या बापाचा आह्मी न्याय करणार आहों, तो तुझ्या नजरेस पडेल. नंतर लागलेंच खुसरूनें आपल्या सैन्यांतील सर्व सरदार जमविले, आणि आर्मीनीया देशांतील मोठ्या संभावित गृहस्थांसही बोलावून आणविलें व बायका गाड्यांत बसून आल्या होत्या त्यांसदेखील त्यानें मनाई न करितां जें चाललें होतें तें पाहण्यास व ऐकण्यास सदर परवानगी दिली.

सारी तयारी झाल्यानंतर गलबला करूं नये, उगीच बसावें, अशी खुसरूनें आज्ञा केली, आणि आरंभीं

आर्मीनियाचे राजास असें सांगितलें कीं, मीजे प्रश्न तु-
ह्मास विचारणार त्यांचीं वास्तवीक उत्तरें द्या, कारण, तुम-
च्या सारख्या थोर पदवीच्या मनुष्यास ओठांत एक व
पोटांत एक असें भाषण करणें ह्यासारखी दुसरी कोणती
ही गोष्ट अश्लाघ्य नाहीं. हें त्याचें बोलणें राजानें कबूल के
लें. नंतर खुसरूनें एक प्रश्न करावा त्याचें उत्तर झा
लें ह्मणजे दुसरा प्रश्न करावा अशा रीतीनें त्यानें पुढील
प्रश्न अनुक्रमानें केले. खुसरूनें विचारलें "आस्तेजीस
नामें मिदिया देशाचा राजा ह्याशीं तुह्मीं पूर्वीं लढाई केली
ही गोष्ट खरी किंवा खोटी? त्या लढाईत तुमचा त्यानें प-
राभव केला किंवा नाहीं? व तुमचा पराभव झाल्यामुळें
तुह्मीं त्याशीं तह केला कीं नाहीं? व त्या तहांत अमूक
खंडणी वर्षास देत जाऊं. अमूक स्वार तुमच्या तैनातीत
देऊं व आपल्या देशांमध्यें किल्ले वगैरे ठेवणार नाहीं अ-
सें तुह्मीं कबूल केलें होतें कीं नाहीं? ह्या सर्व गोष्टी प्रसि
द्ध होत्या, ह्मणून राजानें त्या सर्व कबूल केल्या. त्याच्या
नें नाहीं ह्मणवलें नाहीं. पुनः खुसरूनें असा प्रश्न केला

कीं, असें आहे तर त्या तहाच्या एकाही कलमाप्रमाणें तुह्मीं वागलां नाहीं त्याचें कारण काय? राजानें उत्तर केलें, लोकांचे सत्तेंत नराहणें व आपण स्वतंत्र होऊन आपलीं मुलें बाळें हीं त्याच अवस्थेंत राहतीलसें करणें ही गोष्ट मोठी पुरुषार्थाची आहे असें समजून मीं तह मोडला. त्या खेरीज दुसरें कांहीं कारण नाहीं. खुसरू ह्मणाला होय. स्वातंत्र्य रक्षणार्थ युद्ध करणें हें वास्तवीक मोठें पुरुषार्थाचें काम आहे, परंतु एकादा मनुष्य दुसऱ्याचा दास झाल्या वर जर तो आपल्या धन्या पासून पळून गेला तर तुह्मीं त्यास काय कराल बरें? राजा बोलला, मी त्यास शिक्षा करीन, असें ह्मणणें मला भाग आहे. खुसरू ह्मणाला अथवा तुह्मीं आपल्या पदरच्या कोणी एका मनुष्यास सभ्याचें काम सांगितलें असतां त्यानें जर वाईट वर्तणूक केली तर तें काम तुह्मीं त्याकडे ठेवाल काय? राजा बोलला, छिः कधीं नाहीं. मी त्याच्या जाग्यावर दुसऱ्यास नेमीन. खुसरू ह्मणाला आणि जर त्यानें अन्यायानें पैसा मिळविला असला तर? राजा ह्मणाला मी त्याचें

घरदार सुद्धां लुटून टाकीन. खुसरू- बरें हें असो पण जर तो तुमच्या शत्रूंशीं पत्रद्वारा व्यवहार राखून त्यांस बातमी समजावितो असें असेल तर तुह्मीं त्यास काय कराल ? राजा- आतां ह्या प्रश्नाचें उत्तर देण्यानें मी आपल्या तोंडानें आपणास दोषी ठरवितों असें होईल. परंतु मला सत्य बोललें पाहिजे. खरें ह्मटलें असतां मी त्याचें डोकें मारीन" हें त्याचें बोलणें ऐकतां क्षणींच टायग्रेनीस ह्मणून जो त्याचा मुलगा होता त्यानें आपल्या डोक्यावरून मुगूट काढून टाकिला, अंगावरचीं वस्त्रें फाडलीं आणि जसा कांहीं त्या राजास शिक्षा करण्याचा हुकूम झालाच असें समजून बायका आक्रोश करूं लागल्या.

खुसरूनें सर्व लोकांस उगेच राहा गडबड करूं नका ह्मणून पुनः हुकूम केला. नंतर टायग्रेनीस यानें त्यास या प्रमाणें विनंती केली आपला नोकर करून माझ्या बापास मारणें हें आपणासारख्या सूज्ञास योग्य आहे कीं काय ? खुसरू- यांत माझा तोटा कसा ? टायग्रेनीस- हा आतां तुमच्या फार उपयोगी

पडेल. **खुसरू**- असें तुला कशावरून वाटतें तें? आपण जे अपराध करतों त्यांहींकरून आपली योग्यता वाढत असते काय? व ते अपराध लोकांनीं आपणास मोठें मानावें व आपणावर प्रीति करावी अशी योग्यता आपल्या अंगीं आणतात काय? **राय०**- होय, आणतात ह्यांत काय संशय आहे. पण त्यांच्या योगानें अपराध करणाऱ्यानें शाहाणपण मात्र वाढलें पाहिजे. आणि शाहाणपण ज्याच्या अंगीं आलें त्यास कोण थोर ह्मणणार नाहीं? कां कीं शाहाणपण ही मोठी अमोलिक वस्तू आहे. संपत्ति शौर्य, कौशल्य इत्यादिकांतून एकाच्यानें तरी ह्या गुणाची बराबरी करवेल काय? आजच्या एका दिवसाच्या अद्दलीनें माझ्या बापानें शाहाणपण फारच वाढलें आहे. तुमचा शब्द मोडल्यापासून आपला केवढा नाश झाला हें आज त्यास पक्केपणें समजलें. **खुसरू**- आपल्यापेक्षां सर्व प्रकारें किती श्रेष्ठ आहे हें त्याच्या आज चांगलें अनुभवास आलें.

माझ्या बापानें जितक्या तजविजी योजिल्या होत्या

तितक्यांपेकीं एकही सिद्धीस गेली नाहीं, आणि आपण तर आंपले सर्व उद्देश तडीस नेले. आपण हें काम इतक्या जलदीनें व गुप्तपणें केलें कीं, आपल्यावर हल्ला होईल अशी माझ्या बापास आगा देखील नव्हती. त्याच्या आधींच आपण ह्यास चोहोंकडून घेरून बंदीवान करून टाकलें. आणि ज्या स्थानीं हा आपला बचाव करण्याकरितां गेला तेंच स्थान ह्यास शत्रूंच्या पाशांत पाडण्यास कारण झालें. खुसरू ह्मणाला, पण जेणेंकरून तुझा बाप शहाणा होईल अशीं दुःखें त्यानें भोगलीं नाहींत. टायग्रेनिसानें उत्तर दिलें कीं, शिक्षा झाली नाहीं ह्मणून काय झालें, पण महाराज, असें आहे कीं, साक्षात् दुःख भोगण्यापेक्षां तें पुढें आपल्यावर येऊन गुजरेल असा जर दृढ संभव आहे तर तेणेंकरून जो मनास त्रास होतो तो अधीक आहे ह्या खेरीज मला असें वाटतें कीं उपकारानें जसा मनुष्य बांधला जाऊन वश्य होतो तसा दुसऱ्या कशानेंही होत नाहीं. आणि आज माझ्या बापावर जो उपकार करावयाचा आपल्या हातीं आहे त्या

पेक्षां मोठा उपकार कधीं कोणाच्यानें कोणावर करवणार नाहीं. महाराज, आज जर तुह्मीं ह्याची धन, दौलत स्वातंत्र्य, बायका, मुलें हीं सर्व त्यास मोठ्या औदार्यानें माघारीं दिलीं तर ह्यापेक्षां तुमची सेवा ह्यानें एकनिष्ठेनें करावी त्या विषयीं दुसरें कोणतें उत्तेजन अधीक होईल बरें?

बरें, असें ह्मणून **खुसरू** राजाकडे तोंड फिरवून त्यास ह्मणतो आह्मीं तुमच्या पुत्राची विनवणी ऐकली. तर आह्मीं **बाबिलोनिय** लोकांशीं युद्धास जाऊं त्या काळीं आमच्या कुमकेस तुह्मीं किती सैन्य व किती पैका द्याल? राजानें उत्तर दिलें कीं, सर्व सैन्य व सर्व पैका आतां आपला आहे. इतःपर माझी त्यांजवर कांहीं सत्ता नाहीं. ४०००० पायदळ व ८००० घोडेस्वार इतकें सैन्य मी जमा करूं शकेन व माझ्या बापानें आपले मरण समयीं जो पैसा मला ठेविला होता त्यासुद्धां सुमारें ३०००टालंट*

* टालंट ह्मणजे १८७ १/२ पौंड. १ पौंडाची किंमत १० रुपये. या मानानें १ टालंट ह्याची किंमत १८७५ रुपये होती.

मजपाशीं आहेत, हा पैसा आपला आहे, त्याचें आपण म नास येईल तें करावें. नंतर खुसरूनें निमेंद्रव्य आपल्या बराबर घेतलें आणि बाकीचें आर्मीनियाचे राजानें आर्मीनियन लोकांपासून संरक्षण होण्याकरितां ठेविलें. आणि हा राजा पूर्वी मेदी लोकांस प्रति वर्षी ५० "टालंट" खंडणी देत असे, ती दुप्पट करून त्यानें १०० टालंट द्यावे असें खुसरूनें ठराविलें, व तितकीच दु सरी रकम त्यानें आपल्या नांवानें करून घेतली. नंतर खुसरू ह्मणाला, बरें आतां तुमच्या बायकांस सोड- ण्याबद्दल काय खंड देतां? राजा.जें काय मजवळ आ- हे तें सर्व देतों. खुसरू—मुलाच्या खंडाबद्दल काय देतां? राजा—पहिल्यानें सांगितलें तेंच. खुसरू—ब- रें तर तुमच्या जवळ जें आहे त्याच्या दुप्पट आजपासू- न तुमच्या कडे आमचें ऋण लागू झालें. नंतर खुस- रू टैग्रेनीसास ह्मणाला, तुह्मी आपल्या बायकोच्या सुटकेकरितां काय देतां? टैग्रेनीसाचें नुकतेंच लग्न झालें होतें व त्याची बायकोवर फार प्रीति होती. त्यानें उ-

त्तर दिलें कीं, फारतर काय सांगूं माझे हातीं असतें तर एक काय पण हजार प्राण दिले असते हे शब्द ऐकून खुसरूस फार आनंद झाला. नंतर खुसरूनें त्या सर्वांस आपल्या डेऱ्यांत नेऊन मेजवानी दिली, ह्या प्रसंगीं त्यांस जो आनंद झाला असेल तो सांगावयास नलगे, तो लोकांच्या मनांत सहजच येईल.

भोजन झाल्यानंतर अनेक विषयांवर भाषण करीत असतां खुसरूनें टैग्रेनीस ह्यास विचारिलें. अरे तुझ्या बरोबर शिकार करतांना बहुत वेळां मी एक सुभेदार पाहिला होता तो कोठें दिसत नाहीं, त्याचें काय झालें ? टैग्रेनिसानें डोळ्यांस पाणी आणून उत्तर केलें, महाराज, तो गमावला. असें होण्याचें कारण काय झालें तें माझ्यानें आपणास सांगवत नाहीं. खुसरू बोलरें. काय होईल तें होवो, पण तूं तें मला सांग. असा खुसरूनें बहुत आग्रह केला, तेव्हां टैग्रेनिसानें सांगितलें, कीं माझी त्या सुभेदारावर अत्यंत प्रीति होती व त्याचा माझा परम स्नेह होता. तें पाहून माझ्या बा

पास त्या विषयीं कांहीं शंका उत्पन्न झाली त्यावरून त्या स त्यानें ठार मारिलें. असो तो फार योग्य माणूस होता.त्यानें आपलें प्राणोत्क्रमण होण्याचे समयीं मला बोलावून नेऊन सांगितलें, हे ग्रेनिसा, तुझ्या बापानें मला मारलें म्हणून तूं त्याचा निरुपाय देखील त्रास करूं नको, कारण, त्यानें मला द्वेषबुद्धीनें मारलें असें नाहीं, तर असें होण्याचें कारण त्याची भ्रांति होय. खुसरू बोलला, अहाहा, तो केवढा थोर मनुष्य असावा बरें! त्यानें मरणसमयीं जो तुला उपदेश केला तो तूं विसरूं नको हो.

असें संभाषण झाल्यावर पुनः आपण मित्र झालों हें सूचविण्याकरितां खुसरूनें त्या सर्वांचें आलिंगन केलें, आणि मग त्यांस निरोप दिला. त्यानंतर ते आपल्या स्त्रियांसहवर्तमान रथांत बसून खुसरूचे उपकार स्मरत व त्याच्या वर्तणुकेचें साल्हाद आश्चर्य करीत घरीं गेले.

ते मार्गानें जात असतां कोणी खुसरूच्या शहाणपणाविषयीं स्तुति करीत होते, कोणी त्याच्या शौर्यावि

विषयीं स्तुति करीत होते, कोणी त्याच्या रसिकस्वभावानें आश्चर्य करीत होते व कोणी त्याचें सौंदर्य व राजतेज हीं वाखाणीत होते. सारांश सर्व वाटभर त्यांच्या बोलण्यांत खुसरूशिवाय दुसरें कांहीं आलें नाहीं. टैग्रेनीस आपल्या बायकोस ह्मणाला, हे प्रिये तुला खुसरूच्या स्वरूपाविषयीं व चालचर्येविषयीं कसें वाटलें. ती ह्मणाली हें मी कसें सांगूं? कां कीं, मीं त्याकडे पाहिलें नाहीं. तिच्या नवऱ्यानें पुसलें तर मग कोणाकडे तुझे डोळे लागले होते? तिनें उत्तर दिलें माझ्या मुक्ततेकरितां जो आपले हजार प्राण देईन ह्मणून ह्मणाला त्याकडे माझें लक्ष होतें.

दुसरे दिवशीं आर्मीनियाचे राजानें खुसरूस बहुत नजरा पाठविल्या व त्याच्या सर्व सैन्याच्या खाण्यापिण्याचा बंदोबस्त केला व खुसरूनें जितका पैसा त्याजवळ मागितला होता त्याच्या दुप्पट पैसा घेऊन स्वतः आला, परंतु खुसरूनें जितका पैका घेण्याचें पूर्वीं ठरविलें होतें तितका मात्र घेऊन बाकीचा त्यास माघारा दिला. नंतर खुसरूनें राजास सांगितलें कीं, तुह्मीं

आपलें सैन्य तीन दिवसांत तयार करून त्याचें सेनाधि-
पत्य टैग्रेनीस त्यास देऊन पाठवून द्यावें.

खुसरूनें जी ही आर्मीनियावर स्वारी केली त्याविषयीं आह्मीं जें हें इतकें विस्तारानें वर्णन केलें त्याचीं कारणें फार आहेत. येथें जरी इतका विस्तार केला तरी जेनोफन नामक ग्रंथकारानें जो केला आहे त्याचा हा चौथा हिःसाही नाहीं.

असें करण्यांत पहिला आमचा उद्देश हा आहे, कीं त्या उत्कृष्ट ग्रंथकाराची लिहिण्याची पद्धति कशी काय आहे हें लोकांच्या मनांत येऊन त्याचे ग्रंथ वाचण्याविषयीं त्यांच्या मनांत इच्छा उत्पन्न व्हावी. तो ग्रंथ वाचून त्यामध्यें इतर ग्रंथकारांच्या ग्रंथांत त्यासारखे ओढून ताणून आणलेले गुण नव्हत, तर सहज वृत्त्या आलेले, असे जे बहुत गुण आहेत ते पाहिल्यावर वाचणाऱ्यांची खात्री होईल, कीं वास्तविक रसज्ञ पुरुष, आजपर्यंत त्या ग्रंथकारास त्याच्या लेखाच्या प्रसादगुणावरून व प्रौढतेवरून जो अपूर्व सन्मान देत आले तो त्यास योग्य आहे.

त्या विषयीं वरच्याच वर्णनांत एक उदाहरण आहे तें पाहा. टैग्रेनिसाच्या बायकोनें जें त्यास उत्तर दिलें आहे कीं, तुमच्या मुखावांचून मला दुसरें कांहीं दिसत नव्हतें. हें उत्तर किती मार्मिक आहे व हा रस साधण्यास ग्रंथकारास तिलमात्र तरी श्रम पडलासा दिसतो काय? त्या उत्तरांत तिनें केवढें पातिव्रत्य व केवढी मर्यादशीलता दाखविली आहे!

दुसरा उद्देश असा आहे, कीं खुसरूनें आर्मीनियाचे राजास जे लहानलहान प्रकृत विषयाला लागून व ज्यांचीं उत्तरें समर्पक व सरळ दिलींच पाहिजेत असे जे प्रश्न केले आहेत त्यावरून जेनोफन हा ग्रंथकार साक्रेटिसाचा शिष्य होता असें स्पष्ट दिसतें, आणि साक्रेटीस हा वाद करून एकादी गोष्ट एकाद्याच्या गळ्यांत घालायाची असल्यास त्याचप्रमाणें लहानलहान प्रश्न करून प्रतिपक्षीच्या तोंडांतून आपले इष्ट उद्देश वदवी. तीच रीति जेनोफनास किती आवडत होती हें स्पष्ट कळून येतें.

यास्वेरीज जेनोफनानें जो सायरोपीडिया ह्मणू न ग्रंथ केला आहे तो कसा काय आहे त्याविषयीं ह्या वर्णना वरून कल्पना करितां येईल. ह्या वर्णनामध्यें कित्येक गोष्टी केवळ अलंकारा करितां घातल्या आहेत खऱ्या, पण त्यां- तील तात्पर्य वास्तविक आहे. असें करण्याचें कारण हें आहे कीं, राजानें अमल कसा करावा ह्याविषयीं जे नियम व ज्ञानो त्पा- दक ज्या गोष्टी त्यानें सांगितल्या आहेत त्यांस शोभा यावी अ- सें आहे. तर आह्मी जें पूर्वी लिहिलें त्यामध्यें खरी गोष्ट ह्मणून इतकी आहे कीं, आर्मीनिया देशाचे राजाकडे जी मेदी लो- कांची खंडणी यावयाची होती ती देण्यास तो राजा नाकबूल झा- ला सबब खुसरूनें जाऊन त्यावर लागलाच हल्ला केला, आ- णि त्यास असें देखील वाटलें नव्हतें, कीं आपल्यावर मेदी लोक येणार आहेत. इतक्यांत खुसरूनें त्याचा एकच जो किल्ला होता तो घेऊन त्याच्या बायकामुलांस बंदीवान केलें व राजापासून पूर्वीप्रमाणें खंडणी व कुमकेस लोक देईन असें कबूल करवि- लें. आणि आपल्या दयाळूपणानें व माणुसकीनें त्याचें अंतः करण इतकें वळविलें कीं, मेदी लोकांचा तो विश्वास

व आवडींतला व संकेत साह्यकारी झाला असा कीं तसा त्यांस मागें कोणी मिळाला नव्हता. ह्या खेरीज ज्या दुसऱ्या गोष्टी लिहिल्या आहेत त्या घडल्या आहेत असें नाहीं, केवळ ग्रंथकाराची कल्पना आहे. रोलीन ह्मणून एक मोठा इतिहासकर्ता झाला, तो असें ह्मणतो कीं, टैग्रेनीस ह्याच्या बापानें एका सभेदारास गर मारलें हीजी गोष्ट जेनोफनानें खुसरूच्या वृत्तांतांत लिहिली आहे ती तेथें लिहिण्याचा उद्देश फार गूढ आहे व तो माझ्या ध्यानांत कधीं आला नसता, परंतु एक मोठा चतुर व मोठा वक्ता अशा एका वृद्ध संभावित गृहस्थास ग्रीक भाषेंतील ग्रंथाची माहिती होती, त्यानें त्या गूढ गोष्टीचा अर्थ मला सांगितला व तो मला खरा आहेसें वाटतें. त्या गृहस्थाच्या ह्मणण्यावरून असें दिसतें कीं, आपला गुरु जो साक्रेटीस ह्याचा अंतकाळ कसा झाला हें लोकांस दाखविण्याकरितां जेनोफनानें ही गोष्ट घातली आहे. अथवा शहरांतील सर्व तरुण पुरुषांची साक्रेटिसावर प्रीति बसली, त्यामुळें तेथील अधिका-

री लोकांस त्याच्या विषयीं मत्सर उत्पन्न झाला आणि त्याच्यामुळें त्यांनीं त्यावर खोटा दोष लागू करून त्यानें विष पिऊन मरावें अशी शिक्षा ठरविली. आणि ती शिक्षा त्यानें कुरकूर न करितां सोशिली.

ही गोष्ट विस्तारेंकरून लिहिण्याचा आणखी असा उद्देश आहे कीं, राज्यपदाधिरूढ पुरुषांमध्यें जे गुण सर्वदा आढळत नाहींत व जे युद्धोपयोगी शौर्यादि गुण त्यांपेक्षां राजाच्या आंगीं अधिक योग्यता आणून त्याच्या इष्ट उद्देशाच्या सिद्धीस फार उपयोगीं पडतात ते गुण खुसरूच्या आंगीं होते हें दाखवावें. आजपर्यंत जे मोठे मोठे विजयी पुरूष होऊन गेले त्यांतून बहुतेकांच्या ठायीं शौर्य, धैर्य, पराक्रम, इत्यादि गुण कीं ज्यांच्या योगानें जगांत नांव गाजतें, व लोक दिपून जातात, असे आढळतात पण खुसरूच्या आंगचे वर सांगितलेले गुण त्यांचे ठायीं आढळत नाहींत.

आपण जातां जातां आर्मीनियाचे राजावर कांहीं मोठा उपकार करावा असें खुसरूच्या मनांत आ-

लें त्या राजाच्या शेजारीं **कालडियन** ह्मणून मोठे ल ढाऊ लोक होते. त्यांच्याशीं **आर्मीनियाच्या** राजाचें युद्ध चाललें होतें. हे **कालडियन** लोक **आर्मीनि-या** देशांत वारंवार स्वाऱ्या करून बहुत त्रास देत अ-सत व त्यामुळें पुष्कळ जमीन लागवडीवांचून राहिली होती. मग हे लोक किती काय आहेत, त्यांचा फौज फा-टा किती आहे व त्यांच्या देशांत किल्ले वगैरे कोठें कोठें आहेत ह्या विषयीं प्रथमतः चांगली माहितगारी करून घेऊन **खुसरू** त्यांवर चालून गेला. **खुसरू** आप-ल्यावर येतो आहे अशी बातमी लागतांच, **कालडिय-न** लोकांनी आपल्या पाहाडी किल्ल्यांचा चांगला बंदो-बस्त केला. ह्या पाहाडी किल्ल्यांत ते संकटसमयीं जाऊ न राहत असत. पण **खुसरूनें** किल्ल्यांत सर्व सैन्य जमविण्यास अवसर पडूं न देतां एकदम त्यावर हाल्ला करण्याकरितां त्यानें **आर्मीनियन** लोकांस आघा डीस पाठविलें होतें. त्यांचा पराभव होऊन ते पळूं लागले. त्या गोष्टीची **खुसरू** वाटच पाहात होता, आणि त्यांस

पुढें करण्यांत याचा हेतु हा होता कीं, शत्रूंनी लवकर लढा ई करण्यास आरंभ करावा. जेव्हां कालडियन लोक इ राणी लोकांशीं भिडून हातघाईस आले तेव्हां त्यांच्यानें इराणी लोकांपुढें दम धरवेना. त्यांचा अगदीं पराभव झाला. त्या प्रसंगीं बहुत लोक पाडाव झाले व बाकीचे प ळून गेले. ख्रुसरूनें पाडाव केलेल्या लोकांस सांगित लें कीं, मी तुह्मांस पीडा करावी किंवा तुमचा देश उद्ध्वस्त करावा ह्या हेतूनें आलों नाहीं, परंतु तुह्मी व आर्मीनिय न लोक ह्या उभयतांत दोहोंपक्षीं तोटा न होई असा तह व्हावा ह्या उद्देशानें आलों आहें. असें बोलून त्यानें त्यां स तत्काळ सोडून दिलें.

त्यानंतर कालडियन लोकांनीं लागलेंच ख्रु सरूकडे वकील पाठवून तह केला. मग दोन्ही राष्ट्रां चा चांगला बंदोबस्त राहावा व एकमेकांनीं एकमेकां स उपद्रव करूं नये, ह्मणून दोघांच्या अनुमतानें ख्रु सरूनें एका उंच पहाडावर एक किल्ला बांधविला. त्या किल्ल्याच्या माऱ्यांत सर्व देश होता आणि त्या किल्ल्यां

व जबरदस्त शिबंदी ठेवून जे प्रथमतः तो तह मोडतील त्यांस शिक्षा करण्याकरितां विरुद्ध पक्षाकडे त्या शिबंदीनें मिळावें असें ठरविलें.

कालडियन लोक व हिंदु लोक ह्यांच्या मध्यें पुष्कळ दळणवळण आहे असें खुसरूस कळल्यावरून त्यानें कालडियन लोकांस सांगितलें कीं, आह्मीं हिंदुस्थानाच्या राजाकडे वकील पाठविण्याची तयारी केली आहे, त्या वकीलांबराबर तुह्मीं आपले कांहीं लोक पाठवावे. ह्या वकीलातीचें हांशील असें होतें कीं, खुसरूस इराण देशामध्यें कांहीं सैन्य जमा करायाचें होतें, त्यास हिंदुस्थानचे राजानें कांहीं पैशाचें साहाय्य करावें. हें ऐकून कालडियन लोकांनीं त्यास सांगितलें कीं, आह्मी तुमच्या गुणाचें व अचाट कृत्याचें वर्णन करूं आणि आमच्यानें होईल तितकी भीड खर्चून तुह्मी ह्मणता तें पैशाचें साहाय्य मिळेलसें करूं. हें ऐकून खुसरूस मोठा आनंद झाला. दुसरे दिवशीं खुसरूचा वकील काल

डियन लोकांतील कांहीं मोठे लोक बरोबर घेऊन हिंदुस्थानास जावयास निघाला. कालडियन लोकांनीं आपल्यापैकीं जे संभावित गृहस्थ खुसरूच्या वडिलाबरोबर दिले होते त्यांस त्यांनीं सांगितलें कीं, तुम्ही आपलें सर्व चातुर्य खर्चून खुसरूच्या नांवाप्रमाणें काम करून या.

खुसरूनें आर्मीनिया देशांत जी ही स्वारी केली तिचा असा चांगला शेवट झाल्यावर तो देश सोडून सियाकुसरीस त्यास मिळावयास तो माघारा आला. कालडियन लोकांमध्यें मोठे शूर असे ४०००लोक होते, ते त्याच्या बरोबर आले व यानें आर्मीनियाचे राजावर उपकार करून त्यास शत्रूचें भय नाहीसें केलें ह्मणून त्यानें पूर्वीं जें सैन्य चाकरीस देईन ह्मणून कबूल केलें होतें त्यापेक्षां अधिक सैन्य त्याच्या बरोबर दिलें. येणेंकरून खुसरू जेव्हां स्वारीस निघाला त्या वेळेस जितकें सैन्य घेऊन गेला होता त्यापेक्षां फारच पुष्कळ सैन्य घेऊन परत आला, व आपल्या ब-

रावर वकुन द्रव्यही आणलें. हें पाहून खुसरूचा मा-
मा सियाक्सरीस ह्यास किती आनंद झाला असे-
ल हें सांगावयास नको.

## अध्याय ४

### बाबिलोनियन लोकांवर सियाक्सरीस व खुसरू ह्यांनीं जी स्वारी केली तिज विषयीं.

### त्या स्वारींतील पहिल्या लढाईचें वर्णन.

मेदी लोक व बाबिलोनियन लोक हे सुमारें तीन वर्षेपर्यंत दुसऱ्या राजांचें साहाय्य मिळविण्यांत व लढाईची इतर तयारी करण्यांत गुंतले होते. आपले लोकांचा युद्धाविषयीं आवेश व तयारी पाहून खुसरूनें सियाक्सरीस ह्यास सांगितलें कीं, त्या लोकांस घेऊन आपण आसीरियन लोकांवर चालून जावें. खुसरूनें असें करण्याचीं कारणें अशीं सांगितलीं कीं, एवढे सैन्याचा खर्च जितका लवकर कमी होईल तितका करून आपली काळजी कमी करावी. हे आपल्या देशांतील अन्न खातात. त्यापेक्षां शत्रूचे देशांतील

अन्न ह्यांनीं खावें हें चांगलें. आपण आसीरियन लोकांवर चालून गेलों असतां त्यांचें धैर्य खचेल व आपल्या लोकांस धैर्य येईल आणि माझ्या बापाप्रमाणेच माझी समजूत आहे कीं, पुष्कळ सैन्य असलें ह्मणजेच जय मिळतो असें नाहीं, तर जयप्राप्त होणें सैन्याच्या शौर्यावर आहे. हें ऐकून सियाकुसरीस ह्यानें खुसरूचें ह्मणणें कबूल केलें.

चालीप्रमाणें बळीवगैरे देऊन सियाकुसरीस व खुसरू हे दोघे सैन्य घेऊन निघाले. खुसरूनें सर्व सैन्याच्या नांवानें राष्ट्र देवतांची प्रार्थना केली कीं, आह्मी हल्लीं ज्या स्वारीस निघालों आहों तीस तुह्मीं अनुकूल व्हा, आह्मां बरोबर येऊन आह्मांस मार्ग दाखवा, आमच्या करितां लढा, आणि आमच्या हातून शत्रूंचा पराभव होईल असें धैर्य व शहाणपण आह्मास द्या. सारांश आमचें जेणेंकरून कल्याण होईल तें करा. कोणत्याही कामाच्या आद्यंतीं परमेश्वराची प्रार्थना करावी असा उत्तम उपदेश खुसरूस त्याच्या बापानें केला होता, त्याप्र-

माणें आचरण करण्यास त्यानें आज प्रारंभ केला आणि लढाईच्या प्रारंभीं व शेवटीं सर्व सैन्यासमोर हें धर्मकृत्य करण्यास तो कधीं चुकला नाहीं.

जेव्हां ते आसीरिया देशाचे सिमेवर जाऊन पोंहचले तेव्हां ही त्यांनीं आमचें संरक्षण करा व आह्मास सहाय व्हा अशी देवतांची प्रार्थना केली. नंतर आसीरिया देशांत स्वाऱ्या करून पुष्कळ लूट करूं लागले.

शत्रूचें सैन्य सुमारें दाहावीस दिवसाचे वाटेवर आहे असें समजल्यावर, त्यावर आपण चालून जावें असें खुसरूनें सियाकूसरीस ह्याच्या मनांत आणून दिलें. जेव्हां दोन्हीं सैन्यांची नजरानजर झाली तेव्हां दोन्हीही पक्षांचे लोक लढाईस सिद्ध झाले. आसीरियन लोकांनी आपल्या चालीप्रमाणें तळ देऊन भोवताला मोठा खंदक केला होता. ही चाल पुढें रोमन लोकांनीं उचलली पण आपलें सैन्य थोडें आहे असें शत्रूच्या ध्यानांत नयावें ह्मणून खुसरूनें आपल्या लोकांच्या लहान लहान टोळया टेंकडयांमागें व खिंडींत

ठेविल्या. एक दिवसपर्यंत दोन्ही पक्षांचे लोक एकमेकांकडे पाहत उभे राहिले. दुसरें कांहीं केलें नाहीं. शेवटीं आसीरियन लोकांची मोठी एक टोळी पुढें सरलीशी पाहून खुसरूनें आपल्या सैन्यासहित त्यांवर चाल केली आणि शत्रूंच्या माऱ्यांत येण्याच्या पूर्वीं खुसरूनें लोकांस सांगितलें कीं, जरकरितां आपली दाणादाण झाली तर भगवान हा आमचा संरक्षक व वागविणारा असे खुणेचे शब्द मीं बोललों ह्मणजे तुह्मी एकत्र जमावें.

ह्या प्रसंगीं खुसरूच्या सैन्यांतील सर्व लोक आनंदांत होते. इतरांपेक्षां आपण अधिक पराक्रम करूं अशी प्रत्येक शिपायास ईर्ष्या होती, व शिपाई लोक परस्परांस युद्धामध्यें शौर्य प्रगट करण्याविषयीं उपदेश करीत होते. आणि आपला सेनापति जी काय आज्ञा करील तदनुसार वर्तन करण्या विषयीं सर्व उत्कंठित होते. ह्या गोष्टी खेरीज खुसरूच्या सैन्यांतील लोकांच्या मनांत दुसरें कांहीं वागत नव्हतें. जेनोफनानें असें लिहिलें आहे कीं, जे मनुष्य ईश्वरास अत्यंत भिता-

त ने युद्धादि प्रसंगीं मनुष्यांस अगदीं भीत नाहींत. ही गोष्ट त्या प्रसंगीं स्पष्टपणें दिसून आली. आसीरियन लोकांच्या सैन्यांत जे गोफणगुंडेवाले व तिरंदाज होते त्यांनीं शत्रु माऱ्यांत येण्याच्या पूर्वीच बाणांचा व धोंडयांचा भडमार केला, परंतु खुसरू जवळ होता त्यामुळें त्याचें वर्तन पाहून इराणी लोकांस उत्तेजन आलें आणि लागलीच शत्रूंवर चाल करून जाऊन ते त्यांस भिडले. आणि युद्ध करून अग्रभागीं जीं पलटणें होतीं त्यांच्या रांगा मोडून आंत शिरले. कीजसानें व त्याच्या राजानें आसीरियन लोकांस धीर येण्याकरतां बहुत प्रयत्न केले, परंतु ते सर्व व्यर्थ झाले. कारण कीं, इराणी लोकांच्या कडाक्यापुढें त्यांस उभें राहववेना. ते सर्व पळून गेले. इतक्यांत मेदी लोकांच्या स्वारांनीं शत्रूंच्या स्वारांवर हल्ला करण्याकरितां चाल केली, आणि त्यांचा पराभव करून त्यांच्या पाठीमागें ते मोठ्या आवेशानें लागले व त्यांच्या छावणीपर्यंत त्यांचा पाठलाग करीत गेले. त्यांनीं बहुत लोकांची कत्तल केली.

निरीग्रीज ह्मणून जो बाबिलनचा राजा होता तो या व लढाक्यांत मारला गेला. शत्रूंनीं आपल्या छावणी भोंवता जो खंदक केला होता त्यांतून निघून जाण्यासारखी आपली तयारी नाहीं असें पाहून खुसरूनें माघारें फिरण्याची खूण तुतारीनें केली. आसीरियन लोकांचा राजा पडला, त्यांच्यापैकीं मोठे उमदे उमदे मनुष्य मेले, तेणें करून त्यांची फार त्रेधा झाली. कीजसानें जेव्हां पाहिलें कीं, त्यांच्यामध्यें फार अव्यवस्था झाली तेव्हां तो पळून गेला. आसीरियन लोकांची काय दशा होईल ह्या विषयीं त्यानें किमपि विचार केला नाहीं. ह्याप्रमाणेंच जेव्हां दुसऱ्या संकेत साहाय्यकाऱ्यांनीं पाहिलें कीं, आसीरियन लोकांस आतां कांहीं जय मिळण्याची आशा राहिली नाहीं, तेव्हां त्यांनीं ही रात्रीं संधि पाहून शत्रूंच्या हातून आपली सुटका होण्याची तजविज केली, ह्मणजे ते पळून गेले.

असें होईल हें खुसरूस पूर्वींच कळलें होतें ह्मणून त्यानें त्यांचा पाठलाग करण्याची तयारी केली,

पण त्या कामास स्वार पाहिजे होते आणि इराणी लोकांजवळ तर एकही स्वार नव्हता असें आह्मी पूर्वींच लिहिलें आहे.

त्या कारणास्तव खुसरू सियाकुसरीसापाशीं आला आणि आपला बेत त्यानें त्यास सांगितला, पण त्या विषयीं सियाकुसरीसानें माघार घेतली. खुसरूच्या उद्देशाप्रमाणें करण्यास त्याचें मन घेईना. त्यानें खुसरूस सांगितलें कीं आसीरियन लोकांसारख्या शत्रूंस निकरावर आणणें हें मोठें भयंकर काम आहे. कदाचित् असें होइल कीं, निराशेमुळें त्यांच्या आंगीं शौर्य येईल. आपली चढती कमान झाली असतां आपली इच्छा अधिक अधिक वाढूं न देतां अल्प संतोष वृत्ति धरावी हें शाहाणपणाचें काम आहे. आनंदानें उन्मत्त होऊन जें प्राप्त झालें आहे तें गमावूं नये. त्या खेरीज, त्यानें असें सांगितलें कीं, आज मेदी लोक फार चांगले लढले, तेव्हां त्यांस थोडी विश्रांति घेऊं देणें अवश्य आहे. त्याजकरितां माझ्यानें त्यांस आतां तुजबरोबर जा असें ह्मणवत नाहीं.

हें ऐकून घेऊन खुसरू बोलला कीं, आपल्या खुषीनें म जबरोबर येतील त्यांस तरी मला आपल्याबरोबर नेण्यास आज्ञा द्यावी. सियाकूसरीस त्यानें हें खुसरूचें ह्मणणें संतोषानें स्वीकारलें. आणि खुसरूस वाटेस लावलें. त्यानंतर सियाकूसरीस आपले सरदार लोकांसहवर्तमान जेवणाखाणांत विनोदांत व प्रस्तुत जो जय प्राप्त झाला होता त्याच्या आनंदांत अगदीं गढून राहिला. खुसरू जेव्हां शत्रूंच्या पाठलागास जाण्याकरितां निघाला, तेव्हां बहुत करून सर्व मेदी लोकांचें सैन्य त्याच्या बरोबर गेलें. ह्या मार्गीनें चालला असतां हरकेनियन ह्मणून जे लोक शत्रूंच्या पदरीं होते त्यांजकडील जासूद येत होते, ते त्यास भेटले, आणि त्यांनीं सांगितलें कीं, तुह्मीं दृष्टीस पडण्याबरोबर हरकेनियन लोक येऊन तुह्मांस मिळणार आहेत. पुढें त्या प्रमाणेंच त्यांनीं केलें. क्षणभर विश्रांति न घेतां सर्व रात्रभर चालून खुसरूनें आसीरियन लोकांच्या सैन्यास गांठलें. ते दिवस उन्हाळ्याचे होते सबब कीजस

ह्यानें आपल्या वायव्य शीतळ वेळीं पाठवून देऊन आपण कांहीं घोडे स्वारांनिशीं चालला होता. शत्रू इतके जवळ येऊन पोंहचले हें पाहून आसीरियन लोकांचें धैर्य खचून गेलें आणि त्यांच्यामध्यें अत्यंत अव्यवस्था झाली जे लोक पळून गेले त्यांचा खुसरूनें मोठ्या आवेशानें पाठलाग करून त्यांपैकीं पुष्कळ मारून टाकले व जे छावणींत राहिले होते ते खुसरूस शरण गेले अशा रीतीनें खुसरूचा पूर्ण जय झाला आणि लूटही पुष्कळ मिळाली. आसीरियन लोकांच्या छावणींत जे घोडे सांपडले ते सर्व खुसरूनें आपणास घेतले आणि आपल्या सैन्यांत आजपर्यंत स्वार अगदीं नव्हते ते घालावे असा त्यानें निश्चय केला. लुटीमध्यें जे मोठे मौल्यवान पदार्थ सांपडले ते त्यानें सियाकुसरीस ह्यास नजर करण्याकरितां एकीकडे काढून ठेविले, आणि जे लोक पाडाव केले होते त्यांचीं शस्त्रें घेऊन त्यांजपासून असें कबूल करून घेतलें कीं, ह्यापुढें आह्मी लढाईंत शिरणार नाहीं. ह्या खेरीज, दुसरी खोटनला-

वितां त्या सर्वांस आपल्या देशांस जाण्यास मोकळीक दि-
ली, आणि मी तुमच्या शत्रूंपासून तुमचें संरक्षण करीन
व तुमच्या घरादारास व शेताभातास त्यांजपासून किम-
पि उपद्रव लागूं देणार नाहीं असा खुसरूनें पतकर घे
तला.

मेदी लोक व हरकेनियन लोक हे शत्रूचें कां-
हींसें सैन्य राहिलें होतें त्याच्या पाठीमागें लागले होते, ते
व्हां खुसरूनें हे लोक माघारे आल्यावर त्यांचे श्रमाचा
परिहार करण्याकरितां त्यांस स्वतः दगदग न पडावी
ह्मणून जेवणा खाणाची व आंघोळी पाण्याची वगैरे तया-
री केली, व जी लूट मिळाली होती ती येत तों पर्यंत वांटूं
नये हें खुसरूस नीट वाटून त्यानें तें काम तसेंच करा-
यचें ठेविलें. सर्व गोष्टी खुसरूच्या मनांत वागत अ-
सत. त्यानें इराणी लोकांस असें सांगितलें कीं, जे आ-
जपर्यंत आपल्या उपयोगीं पडले व पुढेंही पडतील अ-
से जे आपले संकेत साहाय्यकारी मेदी लोक व हर-
केनीयन लोक ते माघारे आल्यावर त्यांचा भोग स-

न्मान राखावा व त्यांच्यावर जितके उपकार होतील ति
तके करावे. असें करण्यांत तुमचा मोठा थोरपणा आहे.
त्यानें त्यांस सांगितलें कीं, जेवणाकरितां व लुटीची वां
टणी करण्याकरितां तुह्मीं त्यांची वाट पाहा, आणि आ
पल्यापेक्षां त्यांचें हित व सोय करण्याकरितां अधिक
उत्सुक आहां असें त्यांस दाखवा. आणि तुह्मीं असें के
लें असतां त्यांची आपल्यावर प्रीति जडून त्यांचा व आ-
पला स्नेह चिरकाळ राहील, व असें झालें असतां शत्रू
पासून आणखीही जय मिळतील, तेणेंकरून तुमचे सर्व
मनोरथ परिपूर्ण होतील आपल्या संकेत साहाय्यकाऱ्यां
ची कृपा मिळविण्याकरितां जो आपण आज थोडासा तो-
टा व श्रम सोसूं त्याबद्दल पुढें आपणास मोठीं फळें प्राप्त हो
तील. हा खुसरूचा विचार सर्वांनी मान्य केला. जेव्हां श
त्रूंची पाठ सोडून मेदी लोक हरकेनियन लोक परत आ-
ले तेव्हां खुसरूनें त्यांचासाठीं जेवणाची तयारी केली हो
तीच, ह्मणून त्यांस लागलेंच जेवावयास बसविलें, आणि
सांगितलें कीं, इराणी लोकांस नुसत्या भाकऱ्यामात्र पा

ठेवून द्या, कारण, कोरडेशाची वगैरे सर्व तजवीज त्यांजपाशीं आहे, तुह्मीं त्यांस पाठविणें नलगे. भूक हीन त्यांचें तोंडींलावणें आहे, व त्यांनी ताहान भागवण्यास नदीच्या पाण्यावांचून दुसऱ्या कशाची त्यांस गरज लागत नाहीं.

दुसरे दिवशीं लुटीची वांटणी करूं लागले त्यावेळीं खुसरूनें प्रथमतः मेजाय* त्यांस बोलावून आणून सांगितलें, कीं, असल्या प्रसंगीं ह्या लुटीपैकीं देवास अर्पण करण्यास अत्यंत योग्य जे पदार्थ असतील ते तुह्मीं निवडून घ्यावे. नंतर बाकी राहिलेली सर्व लूट सैन्यास वांटून देण्याचें काम मेदी व हरकेनियन ह्या लोकांस त्यानें सांगितलें. हें काम इराणी लोकांनीं करावें असा त्यांनीं आग्रह धरला, पण इराणी लोक अगदीं ऐकेनात. तेव्हां खुसरूच्या आज्ञेप्रमाणें हें काम त्यांस स्वीकारणें भाग पडलें, आणि त्यांनीं सैन्यांतील सर्व लोकांस संतोष होण्याजोगी वांटणी केली.

ज्या दिवशीं रात्रीं शत्रूचा पाठलाग करण्याकरितां खुसरूनें कूच केलें, त्या रात्रीं सियाकुसरीस ह्यानें आ

---

*: मेजाय ह्मणजे उपाध्याय.

पल्या सैन्यांतील अधिकारी लोकांसह वर्तमान जेवणारखा णामध्यें व ख्याली खुशालीमध्यें पुष्कळ वेळ घालविलाव ते मद्य प्राशन करून गुंग होऊन गेले होते. सियाकुसरीस दुसरे दिवशीं जागा झाला आणि सैन्यापैकीं आपल्याजवळ कोणी नाहीं असे पाहून त्यास मोठें आश्चर्य वाटलें. त्यास मोठा क्रोध येऊन त्यानें तुह्मीं जें काम केलें तें फार वाईट केलें असें खुसरूस सांगून मेदी लोकांस माघारें आणण्याकरितां ताबडतोब जासूद पाठविला. सियाकुसरीस ह्याची ही अयोग्य वर्तणूक पाहून खुसरूस भय नवाटतां त्यानें त्यास सन्मानपूर्वक पत्र पाठविलें, त्यामध्यें त्यानें आपल्यावरील दोष उडविला होता, व जितके लोक खुषीनें तुजबरोबर येतील तितके घेऊन जा ह्मणून जी सियाकुसरीस ह्यानें परवानगी दिली होती तिचेंही त्या पत्रांत सूचन केलें होतें. आणखी देश काबीज करावे ह्या उद्देशानें खुसरूनें इराणी देशांतून आणखीही सैन्य आणविलें.

खुसरूच्या सैनिकांनीं ह्या युद्धांत जे लोक पाडाव केले होते त्यांमध्यें फारच सुंदर अशी एक राजाची बा

यको सांपडली होती, ती त्यांनीं खुसरू करतां ठेविलीहोती. तिचें नांव पाथीया होतें. तिचा नवरा अब्रडेटीस हा सुसीनिया प्रांताचा राजा होता. तिचें लोकोत्तर लावण्य ऐकून खुसरू ह्मणाला कीं, ती जर इतकी सुंदर आहे तर मी तीस पाहाणार नाहीं. कां कीं, तिला पाहिलें असतां कदाचित् माझें मन तिजकडे फारच गुंतून जाऊन मीं जे पुढें मोठे मोठे उद्देश योजिले आहेत ते सिद्धीस जाण्यास अडथळा येईल. ह्या प्रसंगीं जी लोकोत्तर चित्त निग्रह शक्ति खुसरूच्या ठायीं दिसून येते ती त्यास जी लहानपणीं उत्तम शिक्षा मिळाली होती तिचेंच फळ होय. कां कीं, इराणी लोकांमध्यें असा नियम असे कीं, शृंगारसंबंधीं ह्मणून गोष्ट उमेदवारांपुढें अगदीं काढायाची नाहीं. कारण कीं, ह्या वयांत मनुष्यांचे ठायीं विवेक व प्रौढपणा हीं फार कमी असतात, व विषयसुखाच्या उपभोगाकडे त्यांच्या मनाचा फार झोंक असतो. ह्यामुळें त्यांनीं शृंगार संबंधीं गोष्टी ऐकिल्या असतां विषयोपभोगाची इच्छा उत्कट होऊन ते दुर्व्यसनांत पडून मूर्ख होतील. आरास्पीस ह्मणून मेदी लोकांतील एक तरुण

सरदार होता त्याच्या पाहाऱ्यांत ती स्त्री होती. त्यास खुसरू प्रमाणें आपलें मन स्वाधीन राहणार नाहीं अशी शंका नव्हती. तो ह्मणे कीं, मनुष्यास सर्वकाळ आपलें मन स्वाधीन ठेवितां येईल. खुसरूनें ती राजभार्या त्याच्या स्वाधीन तशीच ठेवून त्यास मोठा शाहाणपणाचा बोध केला. तो असा कीं, तो ह्मणाला, मीं बहुत मनुष्य पाहिले आहेत, कीं जे आपणांस मोठे निग्रही मानीत असत, त्यांचा देखील कामदेवापुढें निश्चय चालला नाहीं, व त्यांनीं परिणामी अत्यंत लज्जित व खिन्न होऊन असें कबूल केलें आहे कीं, त्या बलवत्तर मनोविकारानें आह्मांस अगदीं दासवत् वश करून टाकलें, त्यापासून आमच्यानें आपली सुटका करविली नाहीं. हा कामरोग बरा करण्याविषयीं कोणत्याही औषधाचा उपाय चालत नाहीं. मनुष्यानें कितीही उपाय केले तरी ते सर्व व्यर्थ होतात. कामपाश इतका बळकट आहे कीं, लोखंडाच्या मोठमोठ्या बिड्या तोडतां येतील, पण हा तोडणें कठीण आहे. त्यावर आरास्पीसानें उत्तर दिलें कीं, तुह्मीं त्या विषयीं तिळमात्रही शंका मनांत आणूं

न का· माझ्या मनाचा मला पक्का भरंवसा आहे· आणि ह्या कामांत जर माझ्या हातून एकादी गैरवाजवी गोष्ट झाली तर माझें डोकें मारावें अशी त्यानें प्रतिज्ञा केली तथापि पुढें त्या राजपत्नी विषयीं त्याची इच्छा वाढत वाढत इतकी वाढली कीं, ती आपणास कोणत्याही उपायांनीं वश होत नाहीं असें पाहून त्यानें तिजवर जुलूम करण्याचा बेत केला· शेवटीं तिनें ही गोष्ट खुसरूच्या कानावर घातली. त्यावरून खुसरूनें आरबेसीस ह्यास त्या आरास्पिसाला रागें भरून भरून त्याचे डोळे चांगले उघडण्याकरितां पाठविलें· हा हुकूम बजावतांना आरबेसीस ह्यानें त्याची तिळमात्र भीड ठेविली नाहीं· त्यानें जो हा महान् अपराध केला होता, त्याबद्दल त्यानें त्याची अशी खरड काढली व तो त्यास इतके कठोर शब्द बोलला कीं आरास्पीस अगदीं मेल्यापेक्षां मेला झाला. आणि खेदें करून तो इतका विव्हळ झाला कीं, त्याच्या डोळयांतून अश्रूंच्या धारा चालल्या. लज्जा व भय ह्यांहीं करून अत्यंत व्याकुळ होत्सातां आपला आतां सर्वथैव नाश झाला असें समजून तो उगी

चब मला. कांहीं दिवस गेल्यावर त्यास खुसरूनें बोलाव णें पाठविल्यावरून तो त्याकडे मोठ्या भयानें कांपत कांप त आला. त्यास खुसरूनें एकीकडे नेऊन आरबेसीसा प्रमाणें त्याची कठोर शब्दांनीं निर्भर्त्सना न करितां त्यास तो मोठ्या सौम्यतेनें बोलला कीं, हा कांहीं तुझा अपराध ना हीं, ही माझी चूक आहे. मींच मूर्खपणानें तुला ह्या घोर प्रसं गांत घातलें. खुसरू आपणाशीं असें सौम्यतेचें भाषण करील असें त्याच्या ध्यानींमनीं स्वप्नीं नव्हतें. ह्मणून ही अकल्पित दया पाहून त्याच्या जिवांत जीव आला आणि तो बोलूं लागला परंतु त्याच्या मनाची जी गडबड झाली हो ती व त्याच्या अंतःकरणांत जो मोठा आनंद व कृतज्ञताही उत्पन्न झालीं होतीं तीं त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रूंचा जो लोट चालला होता त्याच्या योगानें स्पष्ट झालीं. आरास्पीस ह्मणाला कीं, आतां माझ्या स्वरूपाचें मला पूर्ण ज्ञान झालें. मला वाटतें कीं, मला दोन जीव आहेत, एक मला सदाचरणा कडे प्रवृत्त करितो, व दुसरा दुराचरणाकडे ओढितो. तुह्मी जेव्हां माझ्या शीं बोलतां तेव्हां सदाचरणाची प्रवृत्ति करविणारा जो पहिला जीव त्याचें प्रा

बल्य होऊन मनांतील दुष्टवासनांचा नाश होतो, व मी एकटा असलों ह्मणजे दुष्टाचरण करविणारा जीव प्रबल होतो आणि दुष्ट गोष्टी करण्याची प्रवृत्ति करितो. आरास्पीस ह्यानें आपण खुसरूचा अपराध केला आहे हें मनांत आणून त्याबद्दल त्याची एकदां मोठी कामगिरी बजाविली. ती अशी कीं, आपण खुसरूच्या पदरीं राहून असलों असें मिष करून तो आसीरियन लोकांकडे गेला, आणि त्यांचे सर्व उद्देश व ते सिद्धीस नेण्याकरतां ज्या युक्ति त्यांनीं योजिल्या होत्या त्या सर्वांची माहितगारी करून घेऊन त्या त्यानें खुसरूस येऊन सांगितल्या.

आरास्पीसा सारखा मोठा सरदार आसून शत्रूस खरोखरीच जाऊन मिळाला असें वाटून सैन्यांतील लोकांस मोठी काळजी उत्पन्न झाली. ही सर्व गोष्ट आपणामुळें झाली असें पांथीयेस वाटून ती खुसरूकडे गेली आणि ह्मणाली आपण कांहीं चिंता करूं नये. मी आरास्पीसा सारखा दुसरा सरदार आणून देते. तिच्या मनांत ती जागा आपल्या नवऱ्यास देववायाची होती. मग

तिनें आपल्या नवऱ्यास पत्र पाठविलें, त्यावरून तो २००० दोनहजार घोडेस्वारांनिशीं इराणी लोकांच्या छावणींत येऊन पोहोंचला आणि लागलाच पांथीयेच्या डेऱ्यांत गेला. तेव्हां उदार व विजयी अशा खुसरूनें माझें मोठे ममतेनें संगोपन केलें व माझा बंदोबस्त फार चांगल्या रीतीनें ठेविला असें तिनें नवऱ्यास सांगितलें. ही गोष्ट सांगत असतां तिच्या डोळयांतून अश्रूंच्या धारा चालल्या होत्या. मग तिचा नवरा आब्राडेटीस हा ह्मणाला कीं, खुसरूनें जो एवढा मजवर उपकार केला आहे तो माझ्या हातून कसा फिटेल बरें. पांथीया ह्मणाली, तो जसा तुमच्या उपयोगीं पडला तसे जर तुह्मीं त्याच्या उपयोगीं पडाल तरमात्र त्याचे उपकार फिटतील. त्यानंतर तो आपला हितकर्ता जो खुसरू त्याकडे गेला, आणि त्याचा हात धरून ह्मणतो, हे राजा, मी तुझा जिवलग मित्र, एकनिष्ठसेवक व आजपर्यंत जे तुझे संकेत साह्यकारी झाले त्या सर्वांहून मोठा प्रमाणीक असें तूं मान. त्वां जे माझ्यावर उपकार केले आहेत ते फेडण्याचा मला दुसरा उपाय

सांपडत नाहीं. ह्याकरितां तुझी सेवा करावी ह्या हेतूनें मी आलों आहें. मीं आपला देह आज तुला अर्पिला आहे. खुसरूनें त्याचें अशा औदार्यानें आगतस्वागत केलें व आपल्या आचरणांत इतकी कोमलता व माणुसकी दाखविली कीं, तें सर्व पाहून आब्रडेटीस ह्याच्या जिवाची खात्री होऊन गेली अशी कीं पांथीया हिनें ह्याच्या लोकोत्तर गुणाचें जें वर्णन केलें तें ह्याच्या गुणास फारच योग्य आहे असें त्यास वाटलें.

खुसरूस असें कळलें होतें कीं, आसीरियन लोकांतील दोन संभावित गृहस्थ आपणाकडे येऊन आपला आश्रय करूं इच्छितात. त्याप्रमाणें ते आले आणि त्याच्या मोठे उपयोगीं पडले त्या दोहोंपैकीं एकाचें नांव गोब्रीअस असें होतें. ह्याची वृद्धपणामुळें व सदाचरणामुळें लोकांमध्यें मोठी मानमान्यता होती. मागील लढाईमध्यें आसीरिया देशाचा राजा मृत्यु पावला, त्यास ह्या पुरुषाच्या गुणांची पक्की माहितगारी होती, आणि तो ह्यावरून ह्यास फार मानीत असे. त्या राजानें आपली कन्या ह्या थोर मनुष्याचे

मुलास देण्याचा निश्चय करून त्यास सकुटुंब आपल्या घ
रीं बोलावून नेलें. एके दिवशीं असें झालें कीं, राजपुत्र शि
कारीस निघाला तेव्हां त्यानें त्या मुलास आपले बराबर
शिकारीस बोलाविलें. ते शिकार करीत असतां राजपुत्रा
नें एका श्वापदास बाण मारिला तो चुकला आणि त्याच
श्वापदास त्या मुलाचा बाण लागला. राजपुत्र अत्यंत रागी
ट व मोठा क्रूर होता, त्यास हें पाहून फारच राग आला आ
णि त्यानें त्रासानें त्या मुलास बर्ची मारून तिथल्या तिथें
ठार मारिलें असें झालें होतें, त्यावरून गोत्रीयसानें
जाऊन खुसरूची प्रार्थना केली कीं, आतां माझाव मा
झ्या कुटुंबाचा सांभाळ आपण करून माझा मुलगा ज्या
नें मारिला त्याचा सूड घ्यावा. आतां मला एक कन्यामा
त्र आहे, दुसरें कांहीं अपत्य नाहीं. ही कन्या ज्यानें माझ्या
पुत्राचा प्राण घेतला त्यास देण्याचा माझा बेत फार दिवस
होता परंतु ज्यानें आपल्या भावाचा वध केला त्यास वरा
वयास माझ्या मुलीचें मन घेत नाहीं.

त्या राजपुत्राचें नांव लोबोरासोआरचद असें

होतें त्यानें नऊ महिनेमात्र राज्य केलें व त्याच्या मागून बेलशाहाजर नामें राजा सिंहासनारूढ झाला त्यानें सतरा वर्षे राज्य केलें.

खुसरूकडे दुसरा एक सरदार आला, त्याचें नांव गादातस होतें. हा मोठ्या कुळांतला होता. त्याचें गोत मोठें होतें. बेलशाहाजर राज्याधिरूढ झाल्यावर त्यानें त्यास फार त्रास दिला होता. कारण कीं, त्याच्या नाटकशाळांपैकीं एकीनें गादातस त्याच्या लावण्याचें फार वर्णन करून ह्मटलें होतें कीं, जी स्त्री हा आपली बायको करील ती महत् सुखाचा उपभोग घेईल.

असें दोहोंकडून साहाय्य मिळेल असा संभव दिसल्यावरून खुसरूनें शत्रूंच्या मुलखांत स्वारी करण्याचा निश्चय केला. त्या राज्यांतील मुख्य राजधानी जें बाबिलन शहर तें घेण्याच्या उद्देशानें खुसरूनें ही स्वारी केली होती ह्मणून त्यानें आपली फौज त्या शहराच्या रोखानें चालविली. पण त्या खेपेस त्या शहरावर एकदम हल्ला करून तें हस्तगत करून घेण्याचा त्या

चा मनसबा नव्हता, तर तें डोळ्यांनीं पाहून त्याची सर्व मा हितगारी करून घ्यावी. व शत्रूंचे संकेत साह्यकारी जित के आपल्या पक्षांत ओढले जातील तितके आढावे आणि पुढें जो आपण त्या शहरास वेढा घालणार आहों त्याची तयारी करावी, असे त्याचे बेत होते. ह्याकरितां तो आप ल्या सेनेस हवर्तमान प्रथमतः **गोब्रीयस** ह्याच्या मुल खांत शिरला. ज्या किल्ल्यांत **गोब्रीयस** राहत होता तो इतक्या उत्कृष्ट ठिकाणीं होता व त्याच्या भोंवतालचा को ट इतका मजबूद होता कीं, त्यापुढें शत्रूंचा उपाय चालत नसे. **खुसरू** जवळ आल्यावर हा सरदार त्यास भेटण्या करितां किल्ल्याबाहेर आला आणि त्यानें चाकरांस हुकूम केला कीं, सर्व सैन्यास खाण्यापिण्याची तजवीज चांगली ठेवावी. मग त्यानें **खुसरूस** आपल्या वाड्यांत नेलें व सोन्यारुप्याचे कोटयवधी प्याले व दुसरीं भांडीं त्याच्या पायांशीं ठेविलीं, व आणखी त्या देशांतील ह्यावेळच्या सोन्याच्या नाण्यांनीं भरलेल्या थैल्या त्याच्या पुढें ठेविल्या. नंतर त्यानें आपल्या मुलीस बोलावून आणलें ती स्वरूप

नें फार उत्कृष्ट होती, व दिसण्यांत मोठी देवशालिनी होती. तिनें आपला भाऊ मेला होता ह्मणून देशाचे चालीप्रमाणें आपला पोषाक बदलला होता तेणेंकरून तरती अत्यंत सुरेख दिसत होती. तीस ग्रीब्रीयसानें खुसरूच्या पुढें उभें केलें आणि आतां हिचा संभाळ आपण करावा असें सांगितलें. व आणखी अशी विनंती केली कीं, तुमचा उपकार स्मरून मीजींहीं पात्रें व द्रव्यें आपल्यापुढें ठेविलीं आहेत त्यांचाही आपण स्विकार करावा. तेव्हां खुसरू बोलला हीजी तुह्मीं मला देणगी दिली ही घेण्यास मला फार संतोष आहे, आणि हा पैसा तूं आपल्या मुलीस जें आंदण देणार असशील त्यांत घालण्यास मी देतों. आमच्या दरबारीं इच्याजोगा नवरा सांपडेल ह्याविषयीं तूं अगदीं संशय धरूं नको आमच्या दरबारांतील लोक तुझी शक्ति केवढी आहे किंवा हिला आंदण काय देणार आहेत हें कधीं विचारणार नाहींत. मी तुला वास्तविक सांगतों, कीं आमच्या दरबारीं असे बहुत मनुष्य आहेत कीं ज्यांस संपत्ति केवळ तृणप्राय वाटते. दुष्ट अयोग्य मनुष्यांपाशीं चाबिलुनांतील राजा इतकी जरी संपत्ति असली

तरी ते त्यांस पुसणार नाहींत. आपले मित्रांशीं प्रमाणिकपणानें वागणें, शत्रूस भयंकर असणें व देवांची मर्यादा ठेवणें ह्या गोष्टीविषयीं आपण तत्पर आहों असें दाखवणें ह्यांतच आमचे लोक मोठा पुरुषार्थ मानितात, हें सांगण्यांत मला अगदीं शंका वाटत नाहीं. असें खुसरू बोलला. गोब्रीयसानें आपल्या घरीं भोजन करण्याकरितां खुसरूस बहुत आग्रह केला, पण तें खुसरूनें मान्य केलें नाहीं. आणि गोब्रीयसास बरोबर घेऊन आपल्या छावणींत परत आला. आणि त्यास राहून घेऊन आपल्या सरदारां बरोबर भोजन घातलें. भोजनाचे वेळेस बसावयास त्यांस *पलंग वगैरे कांहीं नव्हतें, ते चारीवर जेवावयास बसले व जेवणाचा बेतही बसण्याप्रमाणेंच साधा होता. गोब्रीयस मोठा शाहाणा समजूतदार मनुष्य होता. आपल्या डामडौलापेक्षांही साधी चाल किती थोरवीची आहे हें त्याच्या मनांत आलें. आसीरियन लोकां-

---

* हल्लीं युरोपियन जसे खुर्च्यांवर बसून जेवतात तसे त्याकाळचे मातबर लोक पलंगावर बसून जेवीत असत.

स छानछोकीनें आपलें तेज पाडुतां येतें पण वास्तविक यो-
ग्यतेनें आपणांस प्रसिद्धीस आणण्याची युक्ति इराणी लो
कांसमात्र ठाऊक आहे असें त्यानें स्पष्ट बोलून दाखविलें.
जेवतांना इराणी लोकांचा सात्विक व आनंदी असा स्वभा
व आणि निष्कपटवृत्ति हीं त्याच्या दृष्टीस पडली, आणि
त्यांचें त्यास सर्व गोष्टींपेक्षां आश्चर्य वाटलें.

आपला बाबिलोन घेण्याचा मोठा जो उद्देश त्याक
डे खुसरूचें लक्ष सर्वकाळ लागलेंहोतें ह्मणून तो ग्रोब्री
यसा सहवर्तमान बाबिलनाचे पलीकडचे बाजूस
गाडाटस ह्याचें संस्थान होतें तिकडे जावयास निघा-
ला. त्याच्या संस्थानासमीप एक मोठा मजबूत किल्ला होता,
त्या किल्ल्याचे माच्याखालीं साइ व क्याडोसियन ह्या
लोकांचे देश होते. तेथें बाबिलनच्या राजाचा सुभेदार
त्या लोकांवर दाब राखण्याकरितां राहत होता. खुस
रूनें त्या किल्ल्यावर हल्ला करण्याचें मिष केलें. गाडाटस
ह्याचा इराणी लोकांशीं सल्ला होता, तो कोणास अद्यापि
माहित नव्हता. ह्याकरितां खुसरूनें सांगितल्यावरू

न गाडाटस ह्यानें त्या मोठ्या उपयोगी किल्ल्याचें संरक्ष
ण करण्याकरितां मी तुह्मांस येऊन मिळतों असें त्या स
भेदारांस सांगितलें. त्यावरून गाडाटसास त्याच्यास
र्व सैन्यासहवर्तमान त्या किल्लेदारानें किल्ल्यांत घेतलें. त्या
नंतर गाडाटस ह्यानें तो किल्ला खुसरूचे स्वाधीन ला
गलाच केला. हा किल्ला मिळाल्यामुळें क्याडोसियन व
साई ह्या लोकांचे देश सहज खुसरूच्या हातीं लागले
आणि त्यानें त्या लोकांस किमपि त्रास न देतां त्यांशीं तो फा
र कृपाळूपणानें वागला. ह्याकरितां त्यांनीं पुढें त्याची चाक
री मोठ्या इमानें इतबारें केली. क्याडोसियन लोकांनीं
खुसरूकरितां २००० दोन हजार पायदळ व ४००० चार
हजार घोडेस्वार तयार केले. ह्या शिवाय साई लोकांनीं
१००० एक हजार पायदळ व २००० दोन हजार तिरंदाज रा
ऊत इतके खुसरूस दिले.

गाडाटसानें हें बंड केलें सबब त्यास शिक्षा क
रण्याकरितां आसीरियाचा राजा सैन्य घेऊन निघा
ला. पण खुसरूनें त्याचे बरोबर युद्ध करून त्याचा परा

भव केला, त्यामुळें त्यास बाबिलनास माघारें जाणें प्राप्त पडलें. त्या लढाईंत आसीरियन लोकांची मोठी कतल झाली. ह्यानंतर कांहीं काळपर्यंत खुसरूनें शत्रूचा देश लुटला. ह्या लढाईंत जे लोक पाडाव केले त्यांस खुसरूनें आपल्या घरीं जाण्यास मोकळीक दिली. अशा दयायुक्त आचरणानें तो जेथें जेथें गेला तेथें तेथें त्याच्या दयाळूपणाची कीर्ति पसरली, व कित्येक लोक स्वसंतोषानें येऊन त्यास वश झाले. येणेंकरून त्याच्या सैन्याची वृद्धि झाली. नंतर बाबिलनावर जाऊन तेथील राजास खुसरूनें असें सांगून पाठविलें कीं, आपण एकवेळ द्वंद्वयुद्ध करून हा कलह समाप्त करूं; पण तें राजानें कबूल केलें नाहीं. आपले पाठीमागें आपल्या संकेत साहाय्यकारी लोकांस त्रास न व्हावा ह्मणून खुसरूनें आसीरियाचे राजापाशीं चार दिवसांचा तह केला. त्यांत दोन्हीं पक्षांचे लोकांनीं असें कबूल केलें कीं, शेतकरी लोकांस कोणीं त्रास देऊं नये. त्यांस शेतें पेरूं द्यावीं, व ते जें उत्पन्न करतील त्याचा उपभाग त्यांस घेऊं द्यावा.

त्याप्रमाणें खुसरूनें सर्व देश पाहून बाबिलन शहरा विषयीं माहिती करून घेतली. आणि बहुत संकेत साहाय्य कारी व स्नेही मिळून व आपल्या घोडेस्वारांची बहुत वृद्धि करून तो मिदिया देशास कूच दरकूच माघारा आला.

तो जेव्हां मिदिया देशाचे सीमेवर येऊन पोहोंचला, तेव्हां त्यानें एक हलकारा सियाकूसरिसाकडे आपण आलों हें कळविण्याकरितां व पुढें आतां आपला हुकूम काय आहे हें विचारण्याकरितां पाठविला. खुसरूचें सैन्य मुळी मोठें होतेंच व त्यास आणखी इराण देशांतून ४००००चा ळीस हजार लोक येऊन मिळाले ह्यास्तव एवढें सैन्य आपल्या देशांत येऊं देणें हें नीट नव्हे असें सियाकूसरिसास वाटून तो दुसऱ्या दिवशीं जे जवळ स्वार होते ते घेऊन खुसरूस मिळण्याकरितां निघाला. खुसरूही आपले स्वार घेऊन त्यास भेटण्याकरितां पुढें आला. हे स्वार पुष्कळ होते व त्यांची तयारीही चांगली होती. तें पाहून सियाकूसरिसास संतोष न होतां उलटा त्याच्या मनांत मत्सर उत्पन्न झाला. त्यानें खुसरूचा चांगल्या रीतीनें

आदर सत्कार करावा तो केला नाहीं, आणि खुसरूनें खुरनिशात केली तिजकडे त्यानें बघितलेंही नाहीं. त्यास फार वाईट वाटून त्याच्या डोळ्यांस पाणी आलें. हें पाहून खुसरूनें जवळ जी मंडळी होती तीस बाहेर जावयास सांगितलें, आणि सियाकुसरिसाच्या मनांत जें आपणाविषयीं वाईट आलें होतें तें काढून टाकण्याविषयीं बोलण्यास आरंभ केला. तो त्याच्याशीं मोठ्या शांततेनें, नम्रतेनें व युक्तीनें बोलला कीं माझ्या मनांत आपणाविषयीं तिळमाय वांकडेपणा नाहीं. माझ्याठायीं आपणाविषयीं पूज्यबुद्धि आहे, आपणावर माझी मोठी प्रीति आहे व आपलें हित साधण्यास मी मोठा तत्पर आहें. हें त्याच्या मनांत भरविण्याकरितां इतकीं सबळ प्रमाणें आणलीं कीं, तत्क्षणींच सियाकुसरिसाच्या मनांतील सर्व शंका गेल्या, आणि त्याची खुसरूवर पुनरपि पूर्णकृपा झाली, आणि खुसरूच्या भलेपणाविषयीं त्याची खातरीही झाली. त्यांनीं परस्परांस आलिंगन दिलें आणि उभयतांच्या डोळ्यांत आनंदाचीं आसवें आलीं. सियाकुस-

रिसाच्या भेटीचा परिणाम काय होतो त्याविषयीं मेदी लोकांस व इराणी लोकांस मोठी काळजी पडली होती, व त्यांस अत्यंत भय वाटत होतें, पण त्या भेटीचा परिणाम चांगला झाला असें पाहून त्यांस जो आनंद झाला तो लिहितां पुरवत नाहीं. सियाकूसरीस व खुसरू हे आपआपल्या घोडयावर बसले, आणि खुसरूनें खूण केल्यावरून मेदी लोक सियाकूसरिच्या जिलबीच्या लोकांत जाऊन उभे राहिले. खुसरूबरोबर इराणी लोक चालले आणि त्याचेबरोबर जे इतर देशांचे राजे होते. त्यांच्याबरोबर त्यांचे लोक चालूं लागले. जेव्हां ते छावणींत येऊन पोहोंचले तेव्हां सियाकूसरिसा करितां जो डेरा तयार केला होता त्यांत तो जातांच बहुत करून सर्व मेदी लोक त्याच्या भेटीस गेले आणि त्यांनीं त्यास मुजरा करून नजरा दिल्या. सियाकूसरिसास भेटावयास जे लोक गेले होते त्यांपैकीं काही एक आपल्या खुषीनें गेले व कित्येक खुसरूच्या सांगण्यावरून गेले. हें पाहून सियाकूसरिसास फार आनंद झाला,

आणि त्याची खातरी झाली कीं, खुसरूनें आपली प्रजा बिघडविली नाहीं. तर तीची पूर्ववत् आपणावर प्रीति आहे तशीच राखली आहे.

क्रीजस राजा व बाबिलोनियन लोक ह्यांवर जी खुसरूनें पहिल्यानें स्वारी केली तींत वर सांगितल्याप्रमाणें त्यास सिद्धि झाली, तिजविषयीं दुसऱ्यादिवशीं सभा झाली, त्या सभेंत सियाकुसरीस व मोठेमोठे मानकरी सरदार ह्यांच्या अनुमतानें असें ठरलें कीं ही लढाई पुढें चालवावी.

जेनोफनानें ह्या लढायावगैरे ज्या मोठमोठ्या गोष्टींचें वर्णन केलें आहे त्या कोणत्याकोणत्या वर्षीं घडल्या हें त्यानें लिहिलेल्या इतिहासांत सांपडत नाहीं. परंतु अशार नामक ग्रंथकारानें आपलें मत असें लिहिलें आहे कीं, मागें जी खुसरूची बाबिलोनियन लोकांशीं लढाई झाली, व त्याची आणि क्रीजस राजाची लढाई झाली ह्मणून पुढें लिहावयाचें आहे, ह्या दोन्ही लढायांच्यामध्यें बहुत वर्षांचें अंतर असावें आणि ह्या अवकाशांत उभयपक्षीं लढाईची तयारी चालली असावी, व ह्याच अवकाशांत खुसरूचें लग्न झालें असा

वें. आतां ह्या अशराच्या मतास जेनोफनाचा लेख तादृश अनकूळ आहे असें नाहीं, पण हें मत आह्मांस बरोबर आहेसें वाटतें.

ह्याच वेळाचे सुमारें खुसरूनें स्वदेशीं जाण्याचा बेत केला. त्यानें सैन्यासहवर्तमान इराण देश सोडून सुमारें सात वर्षें झालीं होतीं. सियाकुसरीस खुसरुची योग्यता मोठी मानीत होता, ह्या गोष्टीचें प्रमाण ह्याप्रसंगीं दिसून आलें. सियाकुसरिसास पुत्र नव्हता, एक कन्यामात्र होती, ती खुसरूस देण्याचा बेत त्यानें केला, आणि मिदिया देशाचें राज्य त्यास तिच्या आंदणाबद्दल द्यावें असाही त्यानें निश्चय केला. सियाकुसरिसाचा हा बेत आपणास अत्यंत हितावह कळल्यानें खुसरूस त्याचा मोठा उपकार वाटून त्यानें त्याचा आभार मानिला. परंतु आईबापांचा रुकार घेतल्यावांचून त्याच्यानें ह्या गोष्टीचा स्वीकार करवेना. असें करण्यांत त्यानें पुढील लोकांस कित्ता घालून दिला कीं, मुलें वयानें कितीही मोठीं असलीं किंवा त्यांस लोकांमध्यें केवढीही योग्यता किंवा अधिकार प्राप्त झाला असला तरी त्यांनीं विवाहादिप्रसंगीं आपली स्वतंत्रता

अगदीं एकीकडे ठेवून आईबाप जें सांगतील तें मोठ्या विनया नें व अनन्यभावें ऐकावें. खुसरू इराणांतून आल्यावर त्या चें सियाकुसरिसाचे मुलीशीं लग्न झालें. लग्नाचा समारंभ आटपल्यानंतर खुसरू आपल्या छावणींत परत आला आणि जितका वेळ सांपडला तितका त्यानें नव्या काबीज केलेल्या देशांचा बंदोबस्त करण्यांत व त्यानें आपल्या मनांत जो मोगा उद्देश योजिला होता तो सिद्धीस नेण्यासाठीं आपल्या संकेत साह्यकारी लोकांसह वर्तमान यथायोग्य तयारी करण्यांत घालविला.

योजलेल्या लढाईच्या पूर्ण तयारीस बहुत दिवस लागतील असें पाहून खुसरूनें विचार केला कीं, आपलें सैन्य इतके दिवस रिकामें बसूं देऊं नये, बसूं दिलें तर नीट नाहीं. ह्मणून त्यानें एक चांगली सोईची व सैन्यांतील लोकांच्या प्रकृतीस मानायाजोगी अशी एक जागा पाहून तेथें छावणी केली व तिचे भोंवताली चांगला मजबूत कोट बांधिला. त्या स्थळीं जसा कांहीं शत्रूच समोर उभा आहे आणि त्या बरोबर लढाई चालली आहे त्याप्रमाणें तो आपल्या सैन्याकडून कवाईत व

फेर फटका करवीत असे. बाबिलनच्या राजापासून जे लोक पळून येत व त्या देशांतून जे जे नेहेमी पाडाव करून आणीत त्यांपासून इराणी लोकांस असें समजलें कीं, बाबिलनचा राजा बहुत सोनें रुपें बरोबर घेऊन लीडियांत गेला. ही बातमी ऐकून सर्व सैन्य सरदार त्यांनीं असें अनुमान केलें कीं, तो संपत्तिवगैरे घेऊन पळून गेला ह्याचें कारण तो आपणास भ्याला हें होय. परंतु खुसरूनें असा सिद्धांत केला कीं तो भयानें पळून गेलानाहीं. तर आपणास नवेनवे शत्रु उत्पन्न करावे हाच त्याच्या जाण्याचा उद्देश होय आणि असें समजून त्यानें लढाईच्या तयारींत पराकाष्ठेची मेहनत घेतली.

सर्व गोष्टींमध्यें आपले इराणी घोडेस्वार हुशार करण्याकडे व नव्या नमुन्याचे रथ तयार करण्याकडे ह्यानें आपलें लक्ष विशेषें करून दिलें. पहिले जुने रथ असत त्यांमध्यें बहुत गैरसोई असत. व ते नवे बांधण्याची चाल ट्राय शहरांतून येऊन ह्या वेळ पर्यंत सर्व एशियेभर चालत आली होती.

इतक्यांत खुसरूकडे हिंदुस्थानच्या राजाकडून वकील पुष्कळ पैसा घेऊन आले. हिंदुस्थानचे राजानें आपल्या

वकिलांस खुसरूला असें सांगावयास सांगितलें होतें कीं, तुह्मांस पैशाची गरज लागली ती तुह्मीं आह्मास कळविली, तेणेंकरून आह्मास फार संतोष झाला. तुमच्या मित्रत्वाची आह्मी फार इच्छा करीत आहों. आणखी पैसा लागल्यास तुह्मीं आह्मास कळवावें, ह्मणजे पुढें आह्मी लागलाच पैसा पाठवून देऊं. ह्या खेरीज त्यानें आपल्या वकिलांस असें सांगितलें होतें कीं, तुह्मीं माझा जसा सन्मान ठेविला त्याप्रमाणें खुसरूचाही ठेवावा. हें सर्व ऐकून खुसरूस मोठा उपकार वाटला. त्यानें ह्या वकिलांचा फार चांगला बंदोबस्त ठेविला त्यांस मोठमोठालीं बक्षिसें दिलीं. हे वकील फार धूर्त आहेत असें पाहून खुसरूनें त्यांस सांगितलें कीं तुमच्यापैकीं तीन असामींनीं हिंदुस्थानच्या राजानें आपलें मित्रत्व संपादावें ह्या बुद्धीनें आह्मांस आपणाकडे पाठविलें आहे असें मिष करून आसीरिया देशाचे राजाकडे जावें आणि त्याचे कसे काय बेत आहेत ते समजून घेऊन आह्मास येऊन कळवावे. हिंदुस्था

नच्या वकिलांनीं हें काम मोठ्या आनंदानें पतकरून तें मोठ्या शाहाणपणानें बजावलें.

त्याप्रसंगीं खुसरूनें आपला प्रामाणिकपणा व शुद्ध वर्तन हीं संभाळलीं नाहींत. वकिलांच्या मिषानें शत्रूच्या दरबारीं चार पाठविणें ही अनिति आहे हें त्यास कळत नव्हतें कीं काय? जे वकीली करतात त्यांच्यानें ही हें असें नीच व विश्वासघातकी कर्म करवणार नाहीं.

अत्यंत मोठमोठालीं कृत्यें ज्याला कर्तव्य आहेत अशा मनुष्याप्रमाणें खुसरू पुढील लढाईची तयारी करीत होता आपल्या सरदारांच्या सभेमध्यें ज्या ज्या गोष्टी ठरत त्या सिद्धीस नेण्यास तो फार जपत असे इतकेंच नाहीं, तर आपल्या सरदार लोकांत उत्तम गोष्टींविषयीं ईर्ष्या उत्पन्न करण्यांत त्यास फार संतोष वाटे. असें करण्यांत त्याचा मानस असा असे कीं, आपल्या लोकांजवळ सर्वोत्कृष्ट हात्यारें असावीं; घोड्यावर बसण्याच्या कामांत हे अत्यंत हुशार असावे; भाला फेंकण्यांत व तीर मारण्यांत

ह्यांचें कौशल्य सर्वांपेक्षां अधिक असावें, व प्रसंग पडल्यास श्रम करण्यांत व हाल काढण्यांत ह्यांचे ठायीं अत्यंत सहनशीलता असावी. हा आपला मनोरथ सिद्धीस जावा ह्यासाठीं तो त्यांस आपल्या बराबर नेहमीं शिकारीस घेऊन जाई, आणि त्या प्रसंगीं जे आपलें नांव गाजवीत त्यांस तो बक्षिसें देई. जेव्हां जे कोणी सरदार आपल्या हाताखालच्या लोकांची चांगली तयारी ठेवतात त्याच्या नजरेस येई, तेव्हां त्यांस असें करण्यास उत्तेजन यावें ह्मणून तो त्यांची सर्व लोकांत स्तुति करी, व त्यांवर आपली फार मर्जी आहे असें दाखवी. जेव्हां तो त्यांस मेजवान्या करी तेव्हां करमणुकीकरितां जे खेळ करावयाचे ते गंजिफा सोंगटीं ह्यांसारखे अप्रयोजक खेळ करीत नसे, तर शर्यती लावणें, पट्टा खेळणें, निशाणमारणें, इत्यादि युद्धोपयोगी खेळ करवीत असे आणि ज्यांची जीत होई त्यांस मोठमोठालीं बक्षिसें देई. अशा रीतीनें त्यानें आपल्या सर्व सैन्यभर युद्ध करण्याची हौस पराकाष्ठेची

वाढविली. सारांश हा अशा प्रकारचा सेनापति होता कीं, हा काम करीत असतां, विश्रांति घेत असतां किंवा सुखोपभोग घेत असतां, कोणाशीं बोलत असतां किंवा सहली स गेला असतां, सर्वकाळ लढाईची उत्तम प्रकारें तयारी करणें ही गोष्ट ह्याच्या ध्यानीं मनीं असे. एखादा मनुष्य युद्धाच्या कामांत परिपूर्ण व मोठा समर्थ होतो तो असें करण्यानेंच होतो.

इतक्यांत हिंदुस्थानच्या वकिलांपैकीं जे असामी आसीरियांत पाठविले होते ते माघारे आले. आणि त्यांनीं अशी बातमी सांगितली कीं, आसीरियन लोकांनीं क्रीजस राजास आपलें सेनाधिपत्य दिलें आहे व त्यांच्या संकेतसाह्यकार्‍यांनीं सैन्य जमा करण्या करितां जितका पैसा लागेल तितका पुरवण्याचें कबूल केलें आहे. थ्रेसिया देशांतील लोकांनीं तर त्यांचा पक्ष उचलला आहे. मिश्र देशांतून १२०००० एक लक्ष वीस हजार लोक कूच दरकूच करीत त्यांच्या कुमकेस येत आहेत. सैप्रस येथून सैन्य येणार आहे. सीलीसीया येथील लोक दोन्हीं फ्रिजियांतील लोक,

ले कोनियन लोक, पाफ्लोगोनियन लोक, अरेबियन लोक, व फिनीकियन लोक हे सर्व तर पूर्वींच येऊन पोंहचले आहेत. आसीरियन लोक बाबिलोनच्या राजाकडे आहेतच. आयोनियन, ग्रुटोलियन, व एशीयांत राहणारे सर्व ग्रीक लोक ह्या सर्वांस आसीरियन लोकांस मिळणें भाग पडलें आहे. कीजसानें लासाडिमोनियन लोकांकडे त्यांशीं स्नेह करण्याकरितां बोलणें लावलें आहे. आसीरियन लोकांचें सैन्य पाकटोलस नदीजवळ जमलें आहे. तेथून तें थिंब्रिया शहरास जाणार आहे. त्या ठिकाणीं सर्व सैन्यांनीं जमावें असें ठरविलें आहे. ह्या वकिलांनीं जें हें वर्तमान सांगितलें तें व बंदिवान करून जे लोक आणले होते त्यांनीं व चारांनीं जें वर्तमान सांगितलें तेंही सर्व बरोबर जमलीं.

हें वर्तमान ऐकून खुसरूच्या सैनिकांचा उत्साह भंग झाला. परंतु खुसरूनें आपल्या सर्व सरदारांस बोलाविलें आणि आपले लोक शत्रूंच्या सैन्यांतील लोकांपेक्षां फारच शूर आहेत ह्याकरितां शत्रूंनीं कितीही सैन्य

जमविलें तरीं कांहीं चिंता नाहीं, असें त्यांस सांगून त्यांच्या मनांतील भय दूर केलें. त्यामुळें त्यांच्या आंगीं पुनः धैर्य आलें.

आपले सैन्यांत युद्धसामग्रीचा तोटा पडूं नये त्याविषयीं खुसरूनें फार चांगली तजवीज केली होती. कोणत्या मार्गानें जावें व कोणत्या रीतीनें शत्रूंशीं लढावें त्याविषयीं सर्व हुकूम देऊन ठेविले होते. त्यानें जे तपशीलवार हुकूम दिले त्यांचें जेनोफनानें विस्तारें करून वर्णन केलें आहे. त्यावरून असें दिसून येतें कीं मोठमोठ्या सरदारांपासून लहान लहान पतकांच्या अधिकाऱ्यांपर्यंत सर्वांस जे हुकूम द्यावयाचे ते त्यानें आपल्या तोंडानें दिले होते. कारण अशी तरतूद ठेविल्यावांचून कोणतेंही मोठें काम सिद्धीस जावयाचें नाहीं. व एखादी क्षुल्लक गोष्ट चुकली असतां सर्व तयारी व्यर्थ जाऊन काम फसतें हें त्यास पक्केपणें माहीत होतें. तो असें ह्मणत असे कीं, कोणती मोठी गोष्ट सिद्धीस नेणें हें काम एखाद्या मोठ्या यंत्राप्रमाणें आहे त्यांतील एखादें चक्र यत्किंचित् वेडें वांकडें झा

लें असतां तें यंत्र बंद पडतें, चालत नाहीं.

**खुसरूस** आपल्या सैन्यांतील सर्व सरदारांचीं नांवें ठाऊक होतीं तो असें ह्मणत असे कीं, कारागिराला एकादें काम पडलें असतां हात्यारांचा जसा उपयोग करावा लागतो तसाच एखाद्या मोठ्या लढाईचा प्रसंग आला असतां किंवा एखादें मोठें अचाट काम हातीं घेतलें असतां सेनाधिपतीस आपल्या सरदारांची योजना करावी लागते. तर कारागिराला आपल्या हात्यारांचीं नांवें ठाऊक असावीं आणि सेनाधिपतीला दुर्लक्ष्यामुळें आपल्या सरदारांचीं नांवें माहित नसावीं हा मोठा चमत्कार आहे. आतां ही उपमा पोरकी आहे खरी पण हीमध्यें अर्थ गूढ आहे. आणि ह्याशिवाय त्याची समजूत अशी असे कीं, सेनाधिपतीस सरदारांचीं नांवें माहीत असलीं ह्मणजे तो आपणांस ओळखतो व आपली योग्यता जाणतो असें त्यांस वाटून त्यांत त्यांना मोठी अब्रू वाटते व सेनाधिपतीवर त्यांची प्रीति बसते आणि तेणेंकरून त्यांस आपलें काम करण्यास हौस येते; इत्यादि बहुत लाभ आहेत.

युद्धाची सर्व तयारी झाल्यावर **खुसरू सिया क्सरिसाची** आज्ञा घेऊन निघाला. आपल्या राज्या चे संरक्षणार्थ सैन्याचा तृतीयांश ठेवून घेऊन **सिया क्सरीस मिदिया** देशांत राहिला.

शत्रूंच्या देशांत जाऊन युद्ध चालवणें हें सर्वदां हि तकारक आहे असें **खुसरूस** माहीत होतें. ह्याकरि तां त्यानें **बाबिलोनियन** लोकांची आपल्यावर **मि-दिया** देशांत चालून येण्याची वाट न पाहतां ते आप ल्या देशांत आहेत तोंच त्यांच्यावर जाऊन हल्ला करावा ह्या हेतूनें तो कूच दरकूच करीत चालला. असें करण्यांत त्यास हें हित दिसलें कीं, शत्रूंच्या देशांत जाऊन युद्धास आरंभ केला असतां आपल्या सैन्याचें पोषण लुटीवर होई ल व आपल्या येण्याची त्वरा व आपलें धैर्य पाहून शत्रूंच्या फौजेची गडबड होऊन जाईल. **थिंब्रिया** देशांत शत्रूंचें सै न्य होतें तेथें जाऊन पोंहचण्यास त्यांस पुष्कळ दिवस लाग ले. त्या देशाची राजधानी जें **सार्डीस** शहर त्यापासून हें **थिंब्रिया** शहर फारसें दूर नव्हतें. **खुसरू** जवळ

आपल्या सैन्याच्या निमें फौज आहे, ह्याकरितां तो आप ल्यावर चाल करून येईल असें शत्रूंस वाटत नव्हतें. शत्रूंनीं आपल्या मोठ्या सैन्यास पुरेशी धान्यादिसामग्री ची तरतूद केली नव्हती तोंच व त्यांच्या मनांत खुसरू शीं लढाई करण्याकरितां जितकें सैन्य जमवायाचें हो तें तितकें जमविलें नव्हतें तोंच खुसरू येऊन पोहों चला, हें पाहून त्यास मोठा अचंबा झाला.

## अध्याय ९

### खुसरू व क्रीजस यांच्यामध्यें जी लढाई थिंब्रिया शहराजवळ झाली ती विषयीं.

प्राचीन काळीं ज्या मोठमोठाल्या गोष्टी झाल्या त्यां पैकींच ही लढाई एक आहे. कारण कीं, बाबिलनांती ल आसीरियन लोक व इराणी लोक हे एशियां तील आधिपत्यासाठीं बहुत दिवस भांडत होते. त्या भां डण्याचा निवाडा ह्या लढाईनें झाला. ह्या लढाईचें आ ह्मी विस्तारें करून वर्णन करतों, ह्याचा उद्देश असा आ हे कीं, प्राचीन काळीं जे मोठे मोठे सरदार होऊन गेले

त्यांतच हा खुसरू गणितात- ह्याकरितां ह्यानें ह्या मोठ्या लढाईत हरएक गोष्टीची कशी काय तजवीज केली होती हें पाहून युद्धकुशल पुरुषांस फार आनंद होईल व ह्याखेरीज प्राचीनकाळचे लोकांची युद्ध चालवण्याची व लढाई करण्याची रीति कशी होती हेंही लोकांस समजेल.

खुसरूनें आपल्या सैन्यांत येणेंप्रमाणें व्यवस्था केली होती. १०० शंभर शिपायांचें एकएक पतक असे, त्या एकेका पतकावर एकेक जुमलेदार असे, एकेका पतकाचे चारचार भाग असत, त्या एकेका भागांत चोवीस चोवीस शिपाई व एकेक हवालदार असे. आणि त्या चोवीस लोकांचे बाराबारांचे दोन विभाग केल्लेले असत. अशा दाहा दाहा पतकांवर एकेक हजाऱ्या असे, आणि अशा दाहा हजाऱ्यांवर एक दाहा हजाऱ्या ह्मणून अंमलदार असे.

आह्मीं पूर्वीच असें लिहिलें आहे कीं, जेव्हां खुसरू ३०००० तीस हजार इराणी लोकांसुद्धां आप

त्या मामाच्या कुमकेस आला तेव्हां त्यानें आपल्या लोकां च्या हात्यारांमध्यें बराच फेरफार केला. त्यावेळपर्यंत खुसरूच्या सैन्यांतील सुमारें दोन तृतीयांश लोक बर्ची वाले व तिरंदाज असत त्यामुळें त्या लोकांस दूरून मात्र लढतां येई. शत्रु जवळ हातघाईस आले असतां त्यांचा उपाय चालत नसे. ह्मणून त्यानें आपल्या सैन्यांतील बहुत करून सर्व लोकांस चिलखतें घालावयास दिलीं. व ढाल तरवारी परशु अशीं शस्त्रें दिलीं. आणि बर्ची वाले व तिरंदाज लोक फार थोडे ठेविले.

घोड्यांवरून कसें लढावें हें तर इराणी लोकांस त्या वेळपर्यंत माहीत नव्हतें. पण लढाईमध्यें जय होण्याकरितां घोडेस्वार उपयोगी आहेत, त्यांसारखें दुसरें कांहीं उपयोगी नाहीं अशी खुसरूची खातरी झाली होती, आणि आपल्याजवळ घोडेस्वार नाहींत त्याजकरितां आपणास मोठी अडचण पडेल असें त्यास वाटून ती अडचण काढून टाकण्या करितां त्यानें पूर्वींच शाहाणपणानें तजवीज आरंभिली होती. अशा तजविजीनें जमतां जमतां त्याच्याजवळ सर्वोत्कृष्ट घो

डे स्वार दाहा हजार जमले.

त्यानें युद्धोपयोगी रथांमध्यें जो फेरफार केला त्या चें वर्णन पुढें करूं. आतां प्रत्येक पक्षाचें सैन्य किती कि ती होतें तें बरोबर सांगतां येत नाहीं. कारण कीं, जेनोफ नानें ह्या विषयीं बरोबर लिहिलें नाहीं. जेनोफना सार ख्या युद्धकुशल पुरुषानें सैन्याची संख्या बरोबर सांगित ली नाहीं ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. जेनोफनाच्या ग्रंथामध्यें कोठें कोठें वाक्यें आढळतात त्यावरून असा त र्क होतो कीं खुसरूचें सैन्य स्वार व पायदळ मिळून १९६००० होतें त्यांपैकीं दाहा हजार चिलखतवाले स्वार होते; वीस हजार चिलखतवाले पायदळ होतें; वीस हजा र बर्चीवाले; वीस हजार तिरंदाज वगैरे, मिळून सत्तर हजार इराणी लोक होते. व बाकीच्यांपैकीं मिदिया, आ र्मीनिया, व अरेबिया, ह्या ठिकाणचे. सव्वीस हजार स्वा र व एक लक्ष पायदळ होतें. ह्याखेरीज त्यांच्याजवळ तीनशें लढाऊ रथ होते. त्या रथांच्या चाकांवर विळे बां धलेले असत. रथांस ओळीनें एकापुढें एक चार घोडे

जुंपीत, व त्या घोड्यांवर ज्या झुली असत त्यांमुळें त्यां
च्यावर तिरांचा लाग कांहीं चालत नसे.

त्यानें ह्यांखेरीज मोठमोठाले रथ तयार करव
ले होते. त्या प्रत्येक रथावर आठरा किंवा वीस फूट उंची
चे बुरूज असत व दर बुरुजांत वीसवीस तिरंदाज अ
सत. ह्या रथांस ओढण्याकरितां ओळीनें सोळासोळा बै
ल लाविलेले असत.

खुसरूच्या सैन्यांत पुष्कळ उंटही होते. प्रत्ये
क उंटावर पाठीला पाठ लावून बसलेले असे तीर मारणा
रे दोनदोन अरब लोक असत. तेव्हां अर्थातच एकाचें
तोंड उंटाचे तोंडाकडे होई व एकाचें उंटाच्या शेंपटीकडे होई.

क्रीजसाचें सैन्य खुसरूच्या सैन्याच्या दुपटी
वर होतें. त्याचे एकंदर ४२०००० लोक होते त्यांपैकीं ६००००
साठ हजार घोडेस्वार होते, व बाकी ३६०००० तीनलक्ष सा
ठ हजार पायदळ होतें तें बाबिलन, लीडिया, फ्रिजि
या, कापेडोसिया, व हेलस्पंट नामक सामुद्रधुनी
च्या भोंवतालचे प्रांत, इत्यादि ठिकाणचें होतें. ह्या मध्यें

मिश्र देशांतील लोकांचें सैन्य एकलक्ष वीस हजार होतें, तें सर्व पायदळ होतें. त्या लोकांजवळ पायांपासून डोक्यापर्यंत पुरणाऱ्या अशा ढाली, लांबलांब भाले, आणि आंखूड तरवारी अशीं हत्यारें होतीं. ह्या खेरीज फिनीशिया, सैप्रस, सिलीसिया, लकोनिया, पाफ्लेगानिया, थ्रेसिया, व आयोनिया, ह्या देशांतूनही बहुत सैन्य आलें होतें.

क्रीजसानें आपलें सैन्य एका ओळींत उभें केलें होतें. पायदळ मध्यभागीं होतें, व दोंहीबाजूंस घोडेस्वार उभे केले होते. ह्या व्यूहांत एकामागें एक अशा तीस रांगा होत्या, परंतु मिश्र देशाचे लोकांची मात्र व्यवस्था निराळी होती. हे सर्व लोक मिळून एकलक्ष वीस हजार होते. हें सर्व पायदळ होतें असें आह्मीं पूर्वीं लिहिलेंच आहे. सर्व सैन्यांत उत्तम पायदळ ह्मटलें ह्मणजे हेच लोक होते. ह्या लोकांच्या दाहा दाहा हजारांच्या बारा टोळ्या होत्या. व ह्या टोळ्यांचे चतुष्कोणाकृति बुरूज बांधिले होते. ह्मणजे शंभर शंभर लोकांच्या शंभर रांगा एकीमागें एक उभ्या के-

ल्या होत्या. लढतांना एकमेकांस एकमेकांची अडचण न व्हावी ह्मणून हे बुरूज दूर दूर बांधले होते. क्रीजसाच्या मनांत असें आलें कीं, शंभर शंभर लोकांच्या रुंदीचे जे हे त्यांनीं बुरूज बांधले आहेत हे असे न बांधतां रुंदी कमी करून लांबी वाढवावी. परंतु तें त्याचें ह्मणणें मिश्र देशाचे लोकांनीं ऐकिलें नाहीं. हीं दोन्ही सैन्यें जेथें उभीं राहिलीं होतीं तें मैदान मोठें आफाट होतें त्यामुळें डाव्या उजव्या बाजूस सैन्याच्या रांगा वाढविल्या असत्या तर तसें करण्यास जागा होती. आणि क्रीजसास आपणास जय प्राप्त होण्याची हीच युक्ति दिसत होती कीं, आपल्या सैन्याच्या रांगा जितक्या लांब होतील तितक्या लांब करून खुसरूचें जें थोडें सैन्य आहे तें चोहोंकडून एकदम घेरून त्यावर एकदम हल्ला करावा. परंतु व्यूह बांधण्याची जी चाल मिश्र देशाचे लोकांस लागली होती. ती त्यांजकडून त्याच्यानें मोडवेना. त्याच्या सर्व फौजेच्या रांगांची लांबी सुमारें अडीच कोस होती.

"आरास्पीस" जो पूर्वी खुसरूस आसल्याचें मिष करून क्रीजसास मिळाला होता, व ज्यास क्रीजस आपल्या सैन्याची कशी काय रचना करतो हें नीट समजून घ्यावयास खुसरूनें सांगितलें होतें, तो लढाई सुरू होण्याचे आदले दिवशीं इराणी लोकांचे छावणींत येऊन मिळाला. त्या सरदारानें शत्रूचा सैन्यरचनेचा जो उद्देश होता तो खुसरू पाशीं यथार्थ वर्णिला. त्याप्रमाणें त्यानें आपल्या सैन्याची रचना केली.

इराणी लोकांची चोवीस लोकांच्या रुंदीचा व्यूह बांधून लढण्याची चाल होती, परंतु खुसरूनें त्या प्रसंगीं तीचाल बदलली. कां कीं, आपलें सैन्य शत्रूस चोहोंकडून वेष्टितां येऊनये, ह्मणून पुढील रांग जितकी लांब होईल तितकी लांब करणें त्यास अगत्य पडलें असें जरी केलें तरी व्यूहाची रुंदी फारच कमी करून तो लवकर फोडतां येईल असें मात्र होऊं दिलें नाहीं. त्याचें पायदळ फार उमदा होतें व त्यांतील शिपायांच्या आंगांत चिलखतें होतीं व त्यांजवळ परशु तरवारी

व भाले हीं हत्यारें होतीं. ह्यामुळें ते एकदा जवळ येऊन पोंहचून हात घाईस आले असतां त्यांच्या सपाट्यापुढें लीडियन लोकांचा टिकाव निघण्याचा बहुतकरून संभव नव्हता; कांकीं, लीडियन लोकांजवळ पातळ ढाली व बर्च्यामात्र असत, ह्याकरितां खुसरूनें आपल्या फौजेच्या रांगांची रुंदी निमेनें कमी करून एकामागें एक अशा चोवीस रांगा उभ्या करा वयाच्या त्यांच्या बद्दल बाराच उभ्या केल्या. ह्याप्रमाणें त्यानें पायदळाची व्यवस्था करून तें मध्यभागीं उभें केलें, व दोहोंबाजूंस घोडेस्वार उभे केले. त्यांपैकीं दक्षिण पक्षाचा सेनापति क्रीजाटस होता व वामपक्षाचें सेनापतित्व हीसदासीस ह्याकडे होतें. खुसरूच्या सैन्याच्या पुढील रांगेची लांबी दोन कोस होती.

तोंडावर जी रांग होती तिच्यामागें खुसरूनें कांहीं अंतरावर भालेवाले उभे केले होते, व त्यांच्यामागें तिरंदाज उभे केले होते. ह्या दोन्ही लोकांस पुढील शिपायांच्या आडून व त्यांच्या डोक्यांवरून भाले

व तीर मारतां येत होते. तिरंदाजांच्या मागें सैन्याच्या पृष्ठभागाचें संरक्षण करण्याकरितां इराणी लोकांच्या सैन्यांतील उमदाउमदा लोक उभे केले होते. त्या लोकांचें काम असें होतें की, पुढील लोकांवर नजर ठेवून त्यांतून आपलें काम चांगलें कोण बजावतो हें पाहून त्यांस शाबासकी देऊन युद्ध करण्यास उत्साह आणावा, व जे कचरतील त्यांस धीर देऊन किंवा धमकावणी दाखवून लढावयास लावावें, व जे लोक हरण्यासारखे पळून जाऊं लागतील त्यांस ठार मारावें. आणि ह्या रितीनें जें पुढें शत्रूंपासून मरण्याचें भय तेंच मागें हटलें असतांही भय आहे असें आपल्या सैन्यांत जे भेदाड असतील त्यांस वाटून ते पळणार नाहींत असें करावें.

त्यांच्या मागें वर सांगितलेले बुरुजाचे रथ उभे केले होते त्या रथांची रांग सैन्याच्या रांगेशीं समांतर व तितकीच लांब होती. ते रथ तेथें उभे करण्यांत दोन उद्देश होते. एक, उद्देश हा की त्यांवरील तिरंदाजां

नीं शत्रूंवर तिरांचा भडमार करून त्यांस त्रास द्यावा, आणि दुसरा असा होता कीं, पुढील लोकांची कतल होऊन त्यांची दाणादाण झाली असतां त्यांनीं या बुरुजाच्या आश्रयास येऊन पुनः एकत्र व्हावें.

त्या रथांच्या रांगे मागें दुसऱ्या दोन रांगा होत्या त्यां पैकीं एक रांग बाजारबुणग्याची होती व दुसरी गाडयांची होती. त्या गाडयांत बायका आजारी वगैरे युद्धास अनुपयोगी लोक होते.

ह्या सर्वांच्या पिछाडीस संरक्षण करण्याकरितां दोन हजार स्वार व दोन हजार पायदळ होतें, व सांडणी स्वारही बरेच होते.

आतां खुसरूनें बाजारबुणग्याच्या व ज्या गाडयांत बायका बसल्या होत्या त्यांच्या रांगा सैन्यांत उभ्या केल्या होत्या. ह्याचें कारण असें होतें कीं आपलें सैन्य खरोखरी जितकें होतें त्यापेक्षां अधिक दिसावें आणि आपल्या सैन्यास चोहोंकडून शत्रु वेढणार आहेत हें त्यांस पूर्वींच कळलें होतें, तर असें ते करूं लागले अ

सतां त्यांस मोठा घेरा घालणें भाग पडावें आणि तेणेंक रून त्यांच्या व्यूहाची रुंदी कमी होऊन तो आपणास फो डतां यावा.

विळे ज्यांच्या चाकांस लावले होते त्या रथांविष यीं आह्मास अजून वर्णन करावयाचें आहे. त्यानें सर्व रथांच्या तीन टोळ्या केल्या होत्या. एकेका टोळींत शंभर शंभर रथ होते. स्कसीयाना देशाचा राजा अब्रडेटीस ह्यास एका टोळीचा सेनापति करून ती टोळी आघाडीस मध्यभागीं ठेविली होती, व दुसऱ्या दोन टोळ्या होत्या त्यांपैकीं एके बाजूस एक व दुसऱ्या बाजूस एक अशा उभ्या केल्या होत्या.

त्याप्रमाणें लढाईच्या पूर्व दिवशीं दोन्हीं सैन्यांची रचना केली होती. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं खुसरू होमहवन करीत असतां सैन्यांतील सर्व लोकांनी थोडी थोडी न्याहारी केली व आपल्या चालीप्रमाणें थोडेंसें मद्य देवाचे नांवानें जमीनीवर ओतून आपण मद्यपान केलें. नंतर त्यांनी चिलखतें चढवीलीं. ह्याप्रसंगीं जो मोठा चमत्का

रिकथाट नजरेस पडला त्यापेक्षां विशेषचमत्कारिकथाट मनुष्यांच्या नजरेस पडणें विरळा. ह्यावेळीं सैनिकांच्या आंगांतील चिलखतें, डोईचे मुगुट, हातांतील ढाली, हीं अशीं झकझकत होतीं कीं, ह्यांतून विशेष शोभायमान कोणास ह्मणावें हें पाहणारास समजेना, व सैनिकांनीं दिव्य लालभडक पोषाक चढवून दिले होते व घोडयांच्या आंगावर नानाप्रकारचीं भूषणें शोभत होतीं, येणेंकरून त्या सर्व सैन्यभर लकलकाट होऊन गेला होता. आब्रडेटीस हा आपल्या देशाचे चालीप्रमाणें तागाच्या कापडाचें रूदार डगलें आंगांत घालणार होता इतक्यांत त्याची स्त्री पांथीया हिनें त्यापाशीं येऊन त्यास एक सोन्याचा मुगूट व कडीं वगैरे भूषणें दिलीं व आंगांत घालण्यास त्याच्या बेतानें एक चिलखत दिलें. मुगुटावर लावण्याकरितां जांबळया रंगांच्या पिसांचा तुरा दिला. तिनें हें सामान नवऱ्यास न कळूं देतां तयार केलें होतें. कारण, हें आपण त्यास युद्धप्रसंगीं एकाएकीं नेऊन दिलें असतां त्यास मोठा चमत्कार वाटून अत्यंत संतोष होईल असा तिचा मानस

होता जेव्हां ती आपल्या हाताने तें चिलखत त्याच्या आं
गांत घालूं लागली तेव्हां तिनें बहुत प्रयत्न केला पण
तिच्या डोळ्यांतून पाणी आल्या शिवाय राहिलें नाहीं.
त्याच्या वरती ची जिवापेक्षां अधिक ममता होती, तथा
पि तिनें त्यास उपदेश केला कीं धारातीर्थी प्राण गेला त
री चिंता नाहीं, पण खुसरूस तुमच्या शौर्या विषयींव यो
ग्यते विषयीं जें मीं सांगितलें आहे त्यास अनुरूप व
तुमच्या मोठ्या कुळास अनुरूप असा पराक्रम रणांगणीं
करून आपलें नांव गाजिवल्या शिवाय माघारे परतूंन
ये. कारण खुसरूचे आपल्यावर जेउपकार झाले आहेत
त्यांस अंत नाहीं. खुसरूच्या सैनिकांहीं मला धरू
न त्याच्याशीं माझें लग्न लावावें असें योजिलें होतें, परं
तु मी त्याच्या हस्तगत झाल्यावर त्यानें मला बंदिवाना
प्रमाणें वागविलें नाहीं, व मला मोकळीक देण्या विषयीं
त्यानें अप्रतिष्ठा दायक अशी कांहीं अट ठेविली नाहीं.
त्यानें मला आपल्या भावजई प्रमाणें ठेविलें होतें, आ
णि मी त्यास सांगितलें होतें कीं तुह्मी हे लोकोत्तर उप

कार फेडण्यास समर्थ आहां. त्यास देवानें हा प्रसंग आण ला आहे तर आज माझें बोलणें सत्य करणें आपणाकडे आहे. हें तिचें परम उदार व गहिंवर आणणारें भाषण ऐकून आब्रडेटीस ह्यानें आकाशाकडे डोकें करून व हात जोडून ईश्वराची ह्याप्रमाणें प्रार्थना केली. हे परमे श्वरा मी पांथीयेस योग्य भर्ता आहे व खुसरू सारख्या परोपकारी पुरुषास योग्य मित्र आहें असें तूं कृपाळू हो ऊन आज माझ्या हातूंन घडीव. असें भाषण करून तो आपल्या रथावर चढला. त्यावेळेस पांथीयेस त्यास आ लिंगन देतां येईना, ह्मणून तिनें ज्या रथांत आपला प्रिय पति बसला होता त्याचेंच चुंबन मात्र केलें, आणि तिनें र थ जोंपर्यंत दिसत होता तोंपर्यंत त्याकडे आपले डोळे लाविले होते. मग तो दिसेनासा झाला तेव्हां ती आपल्या बिऱ्हाडास गेली.

खुसरूनें आपलें होमहवन झाल्यावर सर्व स रदार लोकांस जे जे लढाई विषयीं हुकूम द्यायचे ते दे ऊन त्यांस ईश्वराची प्रार्थना करावयास सांगितलें. त्या

नंतर सर्व सरदार आपापल्या कुद्यावर गेले. कांहीं सरदारांनीं त्या दिवशीं खुसरू करितां द्राक्षासव व अन्न आणिलें होतें त्यापैकीं त्यानें कांहीं उभ्यानेंच खाल्लें आणि बाकीचें जे लोक जवळ होते त्यांस वांटून दिलें आणि थोडेसें द्राक्षासव प्राशन केलें, पण प्राशन करण्याचे पूर्वीं त्यानें देवाचे नांवानें जमीनीवर थोडेंसें पाडिवलें, आणि ह्या प्रमाणें त्याच्या जवळ जे लोक होते त्यांनींही केलें. त्यानंतर त्यानें आपल्या कुळदेवतांची प्रार्थना केली, व त्यांस पुढाकार घेण्यास व साहाय्य करण्यास बोलाविलें. त्यानंतर तो आपल्या घोड्यावर स्वार झाला व सर्वांस आपल्या मागें येण्यास सांगितलें.

आपण सैन्याच्या कोणते भागीं उभें राहावें असा तो विचार करीत आहे, इतक्यांत सैन्याचे उजवे बाजूस मेघगर्जना झाली, ती ऐकून खुसरू मोठ्या आवेशानें बोलला, हे मेघराज, आह्मी तुझे अनुगामी होतों त्यानंतर तो तत्क्षणींच सैन्याचे उजवे भागाकडे चालता झाला. त्याचे उजवे आंगास दक्षिणभागचा अधिकारी कीजां

टस होता व डावे बाजूस वामभागचा अधिकारी हीस टास्पीस हा होता. त्यानें त्या दोघास तुह्मीं जरीपटक्यास विसंबूं नका व पुढें जातांना रांग मोडूं नका त्या दोन गोष्टी इतरगोष्टींपेक्षां विशेष बजाऊन सांगितल्या. त्यांच्या जरीपटक्याच्या शेंडयावर सोन्याचा गरुड पक्षी होता, त्याचे पंख पसरलेले होते. व पुढेंही इराणी लोक आपल्या जरीपटक्यावर हेंच चिन्ह बाळगूं लागले. शत्रूंच्या सैन्याजवळ जाऊन पोहोंचण्यास त्यांस सुमारें सवा कोश चालावें लागलें, परंतु लोकांनीं दमूं नये ह्मणून त्यानें वाटेनें त्यांस तीनवेळां विसावा दिला.

दोन्ही सैन्यांची दृष्टादृष्ट होतांच खुसरूच्या सैन्याची तोंडची रांग आपल्या सैन्याचे रांगेपेक्षां फार आंखूड आहे असें पाहून शत्रूंनीं त्याचें सैन्य चोहोंकडून घेरून एकदम हल्ला करावा त्या बेतानें आपले सैन्याचा मध्यभाग मागें थांबवून डाव्या कडील व उजव्या कडील शेवटें पुढें आणिलीं. ह्याप्रमाणें शत्रूचें सैन्य फिरलेंसें पाहून खुसरूस तिळमात्र देखी

ल भय वाटलें नाहीं. कारण कीं, ते असें करतील हें त्यास पूर्वीच माहीत होतें, आणि आपलें सैन्य फाकलें असतां ईश्वर नेता व रक्षिता हे संकेतशब्द ऐकले ह्मणजे सर्वांनीं जमावें असा संकेत सांगून तो दक्षिणभागीं होता तेथून जाताझाला. जाते समयीं त्यानें त्या भागचे लोकांस असें सांगितलें कीं, मी तुह्मास मिळण्यास लवकरच माघारा येतों आणि ईश्वराची मर्जी असल्यास तुह्मी व आह्मी मिळून शत्रूंचा पराजय करूं.

नंतर तो आपल्या घोडयावर बसून सर्व सैन्यांतल्यांस जे हुकूम द्यावयाचे ते देत व सर्वांस उत्तेजन देत तो फिरला. हा पुरुष इतर सर्व प्रसंगीं मोगमित भाषी व निगर्वी असे, व ज्यानें थोरपणाचा डौल ह्मणून कधींच घातला नाहीं. तो ह्या प्रसंगीं इतक्या निर्धारानें बोलला कीं, त्याच्या बोलण्यावरून ह्या युद्धांत आपलाच जय होईल अशी त्याची खातरी होती असें दिसलें. तो ह्मणाला मित्रांनो, तुह्मी माझे मागें चला. आपला आज जय होईल, ह्यांत किमपि संशय नाहीं. देव आज आपले

साह्यकारी आहेत. त्यांच्या दृष्टीस असें पडलें कीं, आपल्या सैन्यांतील मोठमोठे सरदार व आब्रडेटीस देखील, आपल्या सैन्याच्या दोंही बाजूंवर हल्ला करण्याकरितां शत्रूंच्या सैन्यांतील दोन्ही बाजू पुढें सरसावल्या त्या पाहून घाबरले. तेव्हां त्यांस धीर देण्याकरितां खुसरू त्यांस ह्मणाला, तुह्मांस पुढें सरसावलेल्या सैन्याचें भय वाटतेंसें मला दिसतें, परंतु मी तुह्मांस सांगतों, ह्या गोष्टीवर पक्का भरंवसा ठेवा कीं, ज्या फौजेस तुह्मी भितां तिचाच तुह्मी प्रथमतः पराभव कराल, आणि आब्रडेटीसा ह्या सैन्याचा मोड होऊं लागल्याबरोबर तीच तूं खूण समजून आपल्या सर्व रथांसुद्धां शत्रूंवर जाऊन पड, असें जें खुसरूनें भाकीत केलें होतें त्याप्रमाणेंच पुढें परिणामीं गोष्ट घडली. ह्याप्रमाणें जेथें जेथें ज्याज्या प्रकारचा हुकूम पाहिजे होता तेथें तेथें त्यात्या प्रकारचा हुकूम करून खुसरू सैन्याच्या दक्षिणभागीं पुनः येऊन उभा राहिला.

लीडियन लोकांचे सैन्यापैकीं दोन टोळ्या जि

तक्या हाव्या तितक्या लांब झाल्यावर, कीजसानें आपल्या सैन्याचे मध्यभागीं जे लोक उभे होते त्यांस दुराणी लोकांच्या आघाडीवर चालून जाण्याचा हुकूम केला, व इतक्यांतवरसांगितलेल्या दोहों टोळयांनींहीत्या होन्हीबाजूंवरहल्लाकेला.ह्याप्रमाणें खुसरूचें सैन्य तिहीं बाजूंनीं वेष्टित होऊन दुराणी लोकांस तिहीं तोंडांनीं एकदम लढाई करावी लागली. ह्या प्रसंगीं एका मोठ्या चौरसामध्यें लहान चौरस जसें काढलेलें असावें तसें बाबिलोनियन लोकांचे मोठे व्यूहांत खुसरूचा लहानसा व्यूह दिसूं लागला.

खुसरूनें पहिला इषारा करतां क्षणींच त्याच्या सैन्याचे बाजूचे लोक तोंड फिरवून युद्धाची प्रतीक्षा करीत निमूटपणें उगीच उभे राहिले. ह्यावेळीं खुसरूनें, लढाईचे वेळेस लोक कांहीं स्तोत्र स्वरावर ह्मणत असत, तें ह्मणण्यास आरंभ केला, आणि तें त्याच्या तोंडांतून निघतांच सैन्यांतील सर्व लोकांनीं मोठ्यानें जयजयकार करून देवांची प्रार्थना केली. नंतर खुसरू कांहीं

घोडे स्वारांनिशीं आपल्या सैन्याचे उजवे बाजूवर जें शत्रूंचें सैन्य चालून येत होतें, त्यावर जाऊन पडला, व त्याच्या पाठोपाठ इराणी लोकांच्या पायदळाची एक टोळी धांवून गेली. ह्या प्रमाणें शत्रू आपणावर हल्ला करणार इतक्यांत, त्यांवर पहिल्यानें हल्ला करून इराणी लोकांनीं त्यांच्या सैन्याची मोठी दाणादाण करून दिली. तसेंच ह्यांच्या रथांचे टोळीनेंही त्यांवर मोठ्या आवेशानें चढाव करून जाऊन त्यांचा अगदीं पराभव करून टाकला. त्याच वेळेस त्या बाजूचे सांडणी स्वारांची टोळीही शत्रूंवर धांवून गेली. शत्रूंचे घोडेस्वारांस आपल्यावर उंट चालून येतील असें वाटलें नव्हतें, त्यांचे घोडे दुरूनच उंटांचा वास आल्याबरोबर खिंकाळूं व नाचूं लागले. व उपाई येऊन व दुगाण्या झाडून एकमेकांस लाथा मारूं लागले. ह्या घोटाळ्यांत बहुत स्वार खालीं पडून घोड्यांच्या पायांखालीं तुडवून गेले. कारण घोड्यांना उंटाचा वास सोसवत नाहीं. आणि असा त्यांचा घोळ झालासा पाहून त्यांस एकत्र जमण्यास अवसर न सांपडावा म्हणून

आब्रडेटीस थोडे घोडेस्वार बराबर घेऊन मोठ्याआवेशानें त्यांजवर जाऊन पडला, आणि त्यांस बरेंच मागें खेंचलें. इतक्यांत रथांची टोळीही चालून गेली, तेणेंकरून त्यांची कत्तल उडून त्यांचा अगदीं मोड झाला.

खुसरूनें आब्रडेटिसास शत्रूंवर हल्ला करण्यासहीच ह्मणून सांगितली होती. त्याप्रमाणें तो आपल्या रथांसुद्धां शत्रूंच्या फौजेच्या आघाडीवर तिरासारखा तुटून पडला. त्यांच्या आघाडीच्या रांगांस त्याचा सपाटा सोसवेना ह्मणून त्यांची फुटाफूट होऊन त्यांनीं त्यास वाट दिली. तेव्हां इराणी लोकांच्या रथांची व मिश्र देशाचे लोकांची लढाई सुरूझाली. मिश्र देशाचे लोकांजवळ मोठमोठाल्या ढाला असत व ते अगदीं एकमेकांशीं मिळूनचालत. ह्यामुळें त्यांच्या रांगा मोडण्यास इराणी लोकांस फार श्रम पडले आणि ह्यावेळेस घोड्यांनीं त्यांस जर मोठ्या मस्तीनें तुडवून टाकिलें नसतें तर त्यांच्या रांगा कदापि मोडल्या नसत्या. असो, ह्या प्रसंगीं माणसांच्या व घोड्यांच्या प्रेतांचे मोठमोठाले ढीग पडले, मोठमो

ठे रथ उलथ्याचे पालथे होऊन गेले, हात्यारांचे तुकडे तु कडे उडाले, रथांच्या चाकांस जे विळे लाविले होते त्यांच्या योगानें जें जें त्या रथांच्या सपाट्यांत सांपडलें त्याच्या चिंधड्या चिंधड्या उडाल्या. ह्या सर्व गोष्टींच्या योगें करून तें रणांगण अत्यंत भयंकर दिसूं लागलें. ह्या युद्धांत आब्रडेटीस ह्यानें व त्याच्या बरोबरच्या लोकांनीं लोकोत्तर पराक्रम करून आपलीं नांवें गाजविलीं. परंतु दैवयोगानें त्याचा रथ उलटून तो किती एक लोकांनिशीं मृत्यु पावला. नंतर मिश्रदेशाचे लोक आपल्या ढालांनीं आच्छादित होत्साते मोठ्या जुटीनें पुढें सरसावून त्यांनीं इराणी लोकांचें पायदळास यांचें बुरुजी रथ जेथे होते तेथपर्यंत मागें हाटविलें. मिश्री लोक त्या बुरुजाजवळ आले तेव्हां त्या बुरुजांतील लोकांनीं त्यांच्यावर तिरांची व बर्च्यांची वृष्टि केली, व कोणी पळून जाऊं नये ह्मणून जे खासे खासे लोक पिछाडीस उभे केले होते त्यांनीं जें पायदळ मागें पळूं लागलें होतें त्यास धमकावून पुढें होऊन तरवारींनीं लढाई करावयास लाविलें.

इतक्यांत खुसरूनें शत्रूंच्या डाव्या बाजूच्या फौजेंतील स्वार व पायदळ ह्यांचा पराभव केल्यानंतर जे लोक पळत सुटले होते त्यांच्या पाठीमागें लागून व्यर्थ कालक्षेप केला नाहीं, तर तो तत्काळ मध्यभागीं धांवून आला आणि तेथें उभें केलेलें आपलें सैन्य मागें हटलेंसें पाहून त्यास वाईट वाटलें. मग मिश्री लोकांचें पुढें सरसावणें बंद करण्यास ह्या लोकांवर मागून हल्ला करावा हाच एक उपाय आहे दुसरा उपाय नाहीं, ह्या प्रमाणें यथायोग्य कल्पना काढून त्यानें त्याप्रमाणें केलें. त्याच वेळीं इराणी लोकांचे घोडेस्वार ही शत्रूंवर मोठ्या आवेशानें धांवले. मिश्री लोकांवर ह्याप्रमाणें चोहोंकडून हल्ला चालू झाला असतां त्यांनीं झराझर चोहोंकडें तोंडें फिरवून विलक्षण शौर्यानें आपलें संरक्षण केलें. ह्या लढाईंत खुसरूचे जिवावर मोठें अरिष्ट गुदरलें होतें. तो ज्या घोड्यावर बसला होता त्याच्या पोटांत एका शिपायानें तरवार खुपसून त्यास ठार मारल्यामुळें खुसरू शत्रूंमध्यें खा

ली पडला. जेनाफन ह्मणतो, सेनापतीवर त्याचे हातारवा लच्या शिपायांची प्रीति असणें हें त्यास किती आवश्यक आहे हें पाहण्याची ही मोठी चांगली संधी होती. सरदार व शिपाई ह्यांनीं आपला सेनापति अशा संकटावस्थेंत पडलासा पाहून पडलारे पडला, धांवा, काय पाहातां धांवा, अशी एकच हाकाटी केली, आणि त्याचें संरक्षण करण्याकरितां भाल्याबर्च्यांच्या गर्दीत मागेंपुढें न पाहतां सर्वांनीं एकदम उड्या घातल्या. नंतर रवुसरू मोठ्या चपळाईनें दुसऱ्या घोड्यावर बसला आणि मग त्यानें पहिल्याहीपेक्षां तुंबल युद्ध मांडलें. रक्ताच्या नद्या वाहविल्या. शेवटीं मिश्री लोकांचें शौर्य पाहून रवुसरूस मोठा चमत्कार वाटला, आणि असे शूर लोक मरतात हें पाहून त्यास वाईट वाटून त्यांस त्यानें सांगितलें कीं, तुमच्या सर्व सैकेनसाह्य कारी लोकांनीं तुह्मांस सोडलें आहे, त्यास आतां जर तुह्मीं आमचे हस्तगत व्हाल तर तुमच्या योग्यतेनुसार तहकरूं. मग रवुसरूनें सांगितलेली तहाची

कलमें त्यांनीं मान्य केलीं, परंतु हे लोक जसा आपल्या शि पाईपणाचा अभिमान बाळगीत तसाच त्यांस आपल्या इमानीपणाचाही मोठा अभिमान असे. ह्याकरितां त्यांनीं खुसरू पासून असें कबूल करून घेतलें कीं, कीजस राजाच्या पदरीं आह्मीं चाकरी केली आहे, ह्याकरितां त्या राजावर शस्त्र धरण्याचा आह्मास तुह्मीं आग्रह करूनये हें त्यांचें बोलणें खुसरूनें मान्य केलें, आणि तेव्हांपासून त्या लोकांनीं इराणी लोकांच्या सैन्यांत मोठ्या इमानें इतबारें चाकरी केली.

जेनोफनानें लिहिलें आहे कीं, खुसरूनें समुद्रकिनाऱ्यावरील लारिसा व सिलीनी हीं दोन शहरें व आणखी कांहीं समुद्रापासून अंतरावरचीं गांवें मिश्री लोकांस बक्षीस दिलीं. ह्या ठिकाणीं जेनोफनाचे वेळेस त्या लोकांचे वंशज राहत होते व त्या गांवास मिश्री लोकांचे गांव असें ह्मणत असत.

असो, ही लढाई अस्तमानपर्यंत चालली होती. अस्तमान झाल्यानंतर आपल्या फौजेनिशीं कीजस सा

रडीस नगराकडे चालता झाला. ह्याप्रमाणेंच इतर देश
चे लोकही जे वडाल्या मजला त्यांच्यानें करवल्या ते वडा
ल्या करीत कूच दर कूच आपल्या देशांस गेले. नंतर प्रा
प्त जय असे जे इराणी लोक त्यांनींही थोडें थोडें भोज
न करून सर्व नाक्यांवर पाहारे बरोबर ठेवून ते आप
आपल्या डेऱ्यांत निजावयास गेले.

खुसरूस ह्यावेळीं जो जय प्राप्त झाला तो मुख्य
त्वें करून इराणी लोकांचे घोडेस्वारांच्या योगानें प्रा
प्त झाला, ह्याविषयीं सर्व इतिहासकारांची एकवाक्यता
आहे. हे घोडेस्वार खुसरूनें जातीनें बहुत मेहनत
घेऊन तयार केले होते. ह्यापूर्वी घोडयावर बसण्याची
विद्या इराणी लोकांस अगदींच माहीत नव्हती.

विळे लावलेले रथही ह्या लढाईंत फार उपयोगीं
पडले. ह्यावरून असे रथ लढाईस नेण्याची चाल इरा
णी लोकांत पुढें फार दिवस चालत होती. उंटांनींही ह्या
प्रसंगीं बरेंच काम केलें. परंतु जेनोफनानें त्यांचे फा
रसें वर्णन केलें नाहीं. तो लिहितो कीं, ओझें वाहण्याचे

रीज दुसरें कामास उंटांना लावतांना मीं कधीं पाहिलेंना हीं. ह्यावरून पुढें इराणी लोकांस त्यांचा फारसा उपयोग दिसेनासा झाला असें वाटतें.

ह्या स्थळीं खुसरूची स्तुति लिहावी किंवा त्याच्या योग्यतेचें गौरव करून दाखवावें असा आमचा उद्देश नाहीं. येथें इतकें लिहिणें पुरे कीं, आपल्या चातुर्याच्या योगानें पुढें लढाईंत शत्रू काय करणार ह्याची पूर्वीं भटकळ बांधून त्याचे उपाय व्यर्थ होत अशीच तजवीज योजणें, सैन्यास ज्याज्या गोष्टींची अवश्य गरज आहे त्या सर्व गोष्टींची बराबर तरतूद ठेवणें, आपले हुकूम वेळचे वेळेवर बराबर बजावले जाण्याचा बंदोबस्त राखणें, हुकूम करण्यामध्यें कोणतीही गोष्ट न विसरणें, आपल्या हाताखालच्या सर्व शिपायांची प्रीति संपादणें, व त्यांस लढाई करण्यास हिम्मत व हौस हीं येतील असें करणें, लढाई भरांत आली असतां घाबरें न होतां ज्या ज्या प्रसंगीं जीजी युक्ति पाहिजे ती करणें, शत्रूचे गांठीं देखील गुण दृष्टीस पडला असतां तो वाहाणें, हे गुण

ह्यां खेरीज शौर्य धैर्य चपळता भूतदया क्षमा इत्यादि जे जे उत्तमगुण सेनापतीचे ठायीं असावे ते सर्व खुसरूचे आंगीं पूर्णपणें होते, असें त्या लढाईत स्पष्ट दिसून येतें. जय प्राप्त झाल्यावर खुसरूनें कसें कार्यवर्तन केलें ह्या विषयींचें आह्मीं पुढें वर्णन करूं. परंतु इतर सर्व वर सांगितलेल्या गुणांपेक्षां खुसरूचे आंगीं विशेष चमत्कारिक व परम स्तुत्य गुण जो होता, तो हा कीं, तो सर्व प्रसंगीं परमेश्वराचें स्तवन व पूजन हीं करण्यास चुकत नसे. आह्मीं ह्या लढाईचें जें वर्णन केलें त्या वर्णनांत बकुत ठिकाणीं खुसरूनें सर्व सैन्यादेखत देवांची स्तुति केली व त्यांस बळी दिले व त्यांचा धांवा करून आपण आज मला सहाय्य व्हावें व माझें संरक्षण करावें अशी प्रार्थना केली आहे. हें सर्व पाहून आमच्या वाचणाऱ्यांस खचीत आश्चर्य वाटलें असेल. परंतु ह्या सर्व वर्णनांत इतर ग्रंथांचा आधार सोडून आह्मीं पदरचें तिळमात्र लिहिलें नाहीं. ह्या विषयावर ग्रीक भाषेंतील ग्रंथकर्ता जो जेनाफन तोही स्वतः मोठा शिपाई होता. आणि त्यास, सैन्यासमोर

अशीं सेनापतीनें देवभक्तीचीं कृत्यें केलीं हें सांगण्यांत आपणास व आपल्या शिपाईपणाच्या बाण्यास कांहीं लहानपणा आहे असें वाटलें नाहीं. ह्यावरून हल्लीं शूरपणाचा जे अभिमान बाळगतात त्यांस देवांची प्रार्थना वगैरे धर्मकृत्यें करण्याची लाज वाटते, व अशी कृत्यें करणें हें भटाभिक्षुकांचें काम, आह्मां तरवारबाहादर लोकांस हें अनुचित अशी त्यांची समजूत असते. हें त्यांचें केवढें मौर्ख्य व अज्ञान असावें !

ह्या सर्व लढाईंत कीजसानें कांहीं एखादें देखील मोठें कृत्य केलेंसें आढळत नाहीं. फारतर काय ह्या सर्व लढाईंत त्याचें नांव सुद्धां कोठें निघत नाहीं. जेनोफन ह्याच्याविषयीं कांहींच लिहित नाहीं. ह्यांत तो असें सुचवितो कीं, मोठा संपत्तिमान् व ज्याच्यापदरीं मोठाल्या फौजा आहेत तो राजा मोठा शूर असतो असें नाहीं.

असो, इकडे इराणी लोकांच्या छावणींत काय वर्तमान झालें त्याचें वर्णन करतों. आब्रडेटीस लढाईंत पडला हें वर्तमान पांथीयेनें ऐकिल्यानंतर तीस कि

ती दुःख व केवढा शोक झाला असेल ह्या विषयीं सांगावें यास नको, तिनें त्याचें प्रेत आणवून त्या खेदकारक विषयाकडे डोळे लावून गुडघ्यांत मान घालून ती वेड्यासारखी बसली, आणि त्या दुःखाच्या भरांत तिला खाणेंपिणें कांहींच सुचेनासें झालें. फारतर काय तिला आपल्या देहाचें देखील भान राहिलें नाहीं. अशी पाथीयेची अवस्था झाली आहे असें खुसरूच्या कानावर पडतांच तो तत्क्षणींच तिजकडे धांवत आला आणि तिच्याबरोबर त्यानें बहुत शोकही केला. त्यानें आपल्याकडून होईल तितकें तिचें सांत्वन केलें व आब्रडेटीस ह्याचें उत्तरकार्य मोठ्या लोकोत्तर समारंभानें करावें असा कामगार लोकांस हुकूम देऊन तो आपल्या शिबिरास गेला. परंतु खुसरू निघून जातांच पांथीया शोकानें वेडी होऊन आपल्या पोटांत कट्यार खुपसून घेऊन नवऱ्याच्या प्रेतावर मरून पडली. नंतर त्या दोघांस एके ठिकाणीं पुरून त्यांवर मोठी एक कबर बांधली. ही कबर जेनोफनाचे वेळेस होती.

# अध्याय ६

## खुसरूनें "सारडीस" शहर घेतलें व क्रीजस राजास धरलें ह्याविषयीं.

लढाईच्या दुसरे दिवशीं प्रातःकाळीं खुसरू सारडीस शहराकडे चालू झाला. खुसरूच्या बेत सारडीस शहरास वेढा घालून आपणास कोंडून टाकावें असा आहे असें क्रीजसास वाटत होतें. ह्मणून खुसरूस गांठून त्याशीं लढाई करावी ह्या उद्देशानें तो सैन्य बरोबर घेऊन निघाला. लीडियन लोक सर्व एशिया माइनरांतील लोकांपेक्षां फार शूर होते असें हिराडटस ग्रंथकारानें लिहिलें आहे. त्याच्या सैन्याचा उत्तम भाग ह्मटला ह्मणजे घोडेस्वार असत. त्या घोडेस्वारांपासून त्यांस तादृश उपयोग न व्हावा ह्मणून खुसरूनें आपले सांडणीस्वार पुढें घातले. उंटांची घाण घोडयांस सोसवत नाही, व त्यांस पाहून घोडयास त्रास येतो. सबब घोडेस्वार माघारे गेले, आ

णि घोडयांवरून उतरून पायीं लढाईस आले, त्यावेळेस दोन्ही पक्षांचे लोक मोठ्या निकरानें लढले. शेवटीं इंडियन लोकांचा मोड होऊन त्यांस शहरांत मागें जाणें भाग पडलें. तेव्हां जसा काय हल्ला करून शहर घ्यावें असा आपला बेत आहे असें दाखविण्याकरितां खुसरूनें तट पाडण्याचीं यंत्रें रोखवायाचा व तटावरून चढून जाण्याच्या शिडया तयार करण्याचा हुकूम दिला. त्या रीतीनें शहरांतील लोकांस भुलथाप देऊन रात्रीं चोरवाटेनें जाऊन त्यानें त्या शहरचा किल्ला आपल्या हस्तगत करून घेतला. किल्ल्याची ही चोरवाट त्या किल्ल्याच्या सभेदाराजवळ एक इराणी चाकर होता त्यानें खुसरूस दाखविली. मग दुसरे दिवशीं तो मोठ्या पाहांटेस शहरांत शिरला. तेव्हां त्यास कोणीही प्रतिबंध केला नाहीं. नंतर आपल्या सैन्यांतील शिपाई रांगा सोडून चोहोंकडे फांकलेसें पाहून, हे आतां शहर लुटण्याच्या बेतांत आहेत असा त्यांस अंदेशा येऊन त्यानें ती गोष्ट बंद करण्यास प्रथमतः तजवीज केली. खुसरूचा त्याच्या सै

त्यावर जसा हुकूम होता तसा असल्यावांचून साळखी सा सारखें शहर जेथें सोन्या रुप्याचा धूर निघत होता, तें शहर काबीज केलें असतां शिपायांस लुटूं न देणें हें व्हावयाचें कठीण. नंतर खुसरूनें सर्व शहरांत जाहिरात फिरवून तेथील लोकांस असें कळविलें कीं तुह्मीं आपल्या जवळचें सर्व सोनें रुपें नव्या सरकारांत हजर केलें असतां तुमच्या जिवास किंवा बायकामुलांस कांहींमात्र धक्का लागणार नाहीं. हें खुसरूचें ह्मणणें त्यांनीं मोठ्या संतोषानें मान्य केलें, कारण, त्यांचा राजा क्रीजस हा जेव्हां खुसरूच्या आज्ञेवरून त्यास भेटावयास गेला तेव्हां त्यानें आपल्या जामदारखान्यांतील सर्व दौलत बराबर घेऊन ती खुसरूपुढें ओतली. मग खुसरूनें शहराच्या बंदोबस्ता करितां जे जे हुकूम द्यावयाचे होते ते ते दिले आणि क्रीजसास एकांतीं घेऊन जाऊन त्यास बहुत प्रश्न केले. त्यांत एक प्रश्न असा केला कीं, डेल्फाय नामें संस्थानच्या देवावर तुमची मोठी निष्ठा आहे ह्मणून मी ऐकतों त्यास त्या

देवतेनें जो मागें तुह्मास कौल दिला होता त्या विषयीं आतां तुह्मास कसें काय वाटतें. क्लीजसानें उत्तर दिलें तुह्मीं ह्मणतां हें खरें आहे. माझी त्या देवावर मोठी निष्ठा आहे खरी, परंतु त्या देवाच्या कौलावर माझी फार अश्रद्धा झाली व देवाचें सत्व पाहण्याकरितां म्यां भलतेभलते कौल लाविले. ह्यामुळें मजवर त्याचा यथार्थ कोप झाला आणि असें झालें असतां देवावर दोष ठेवण्यास मला जागा राहिली नाहीं. मी देवास एकवेळ असा कौल लाविला कीं, सर्व आयुष्य सुखानें घालविण्यास कोणता उपाय आहे? त्यावर देवानें जें उत्तर दिलें त्याचा तात्पर्यार्थ असा होता कीं, ज्या दिवशीं मला माझी वास्तविक योग्यता कळेल त्या दिवसापासून मला पूर्ण व अविनाशी सुख प्राप्त होइल. ही गोष्ट आज माझ्या प्रतीतीस आली. पाह्या लोक माझी पराकाष्ठेची स्तुति करीत, त्यावरून मी आपली मूळची योग्यता विसरलों आणि आपल्याठायीं नसतां मोठेपणा मानून **बाबिलोनियन** लोकांच्या सर्व सैन्याचा सेनापती ही पदवी स्वीकारून मजपे

क्षां अनंतगुणांनीं श्रेष्ठ असे जे आपण त्यांबराबर लढाई करावयास प्रवृत्त झालों. पण ह्या माझ्या अज्ञानाचें फळ मला लवकरच प्राप्त झालें आतां माझा पराजय झाला तेव्हां माझें स्वरूप मला कळून आलें. आणि मी सर्वप्रकारें तुमच्या हस्तगत झालों आहे. आतां जर तुह्मीं मजवर कृपा कराल तर येथून पुढें माझें आयुष्य सुखांत जाईल असा मला पूर्ण भरंवसा आहे. जो एवढा **क्रीजस** राजा एवढ्या उंच पदवीस होता त्याची एका क्षणांत अशी दशा होऊनगेली. हें पाहून **खुसरूस** फार दया आली, आणि अशा ह्या संकटकाळीं **क्रीजसाची** समाधानवृत्ति पाहून त्यास मोठा संतोषही झाला. मग **खुसरूनें** त्याचें राज्य त्याच्या स्वाधीनकेलें. एवढी मात्र अट ठेवली होती कीं, त्यानें आपल्या हुकुमावांचून कोणाशीं लढाई करूं नये. ह्या प्रमाणें **खुसरूनें** कृपाळूपणें राज्यकारभारांतील युद्धादि गोष्टींचें ओझें त्याच्या डोकीवरून उतरून त्यास त्याच्या इच्छेप्रमाणें वास्तविक सुखानें आयुष्य घालविण्यास स

मर्थ केलें. त्या पुढें खुसरूनें ज्या ज्या स्वाऱ्या केल्या त्यांत तो कीजसास बरोबर नेत असे. ह्याची कारणें बहुत दिसतात. हा राजा लढाईच्या कामांत मोठा वाकब गार आहे असें समजून त्यास प्रसंगीं एखादी मसलत पुसतां येईल ह्या उद्देशानें त्यास खुसरू बरोबर नेत असो किंवा असें करून त्यास विशेष आपल्या ताब्यांत ठेवावें असें त्याचें कारस्थान असो.

हिराडिटस वगैरे ग्रंथकारांनीं हीच गोष्ट उसऱ्या प्रकारानें सांगितली आहे. आतां त्या प्रकारें ही गोष्ट घडली असो किंवा नसो पण ती फारच चमत्कारिक रीतीनें सांगितली आहे ह्याजकरितां ती आह्मांस येथें लिहिणें अवश्य आहे असें वाटतें.

कीजसास एक मुलगा होता तो मुका होता. ह्या लढाई मध्यें एक इराणी शिपाई आपली तरवार उपसून ती कीजसाच्या डोक्यांत घालतो आहे हें त्याच्या पुत्रानें पाहतांच तो दुःखानें अत्यंत विव्हळ होऊन गेला आणि त्या दुःखाच्या संभ्रमांत बोलण्याचा जो मो

ठा प्रयत्न केला तेणेंकरून त्याच्या जिभेचीं बंधनें तुटू न तो एकाएकीं मोठ्या दीनस्वरानें ओरडून बोलला, हे शिपाया तूं क्रीजसास मारूं नको, त्यास जीव दान दे.

त्या ग्रंथकारांनीं आणखींही एक गोष्ट अशी लिहिली आहे कीं, क्रीजसास धरल्यानंतर त्यास जिवंत जाळावें असा खुसरूनें हुकूम केला. त्यावरून सैनिकांनी एक मोठी चिता रचून त्या बापुडया क्रीजसास तीवर ठेविलें, आणि ती पेटविणार इतक्यांत क्रीजसास सोलन याच्या वाक्याचें स्मरण झालें आणि त्याच्या भाषणाची सत्यता त्या प्रसंगीं त्याच्या प्रत्ययास येऊन त्यानें त्या पंडिताचें (सोलनाचें) नांव त्रिवार उच्चारिलें. तें ऐकून खुसरू त्याच्या जवळ आला आणि त्यानें त्यास विचारिलें तूं आतां अंतकाळीं त्या प्रसिद्ध पुरुषाचें नांव कां काढिलें. तेव्हां क्रीजसानें उत्तर दिलें कीं मागें एकवेळ तो सूज्ञ पुरुष माझ्या दरबारीं आला होता तेव्हां ह्या जगांत अत्यंत सुखी कोण असें मीं त्यास विचारिलें, आणि मला असें वाटत होतें कीं माझ्या

सारखा संपत्तिमान दुसरा कोणी ह्या जगांत नाहीं, ह्या करितां तो माझें नांव घेईल. परंतु त्यानें मला असें उत्तर दिलें कीं, बाबा, ह्या जगांत कोणतीही गोष्ट शाश्वत नाहीं. रावाचा रंक आणि रंकाचा राव होण्यास एक क्षण देखील लागत नाहीं. ह्याकरितां अमुक मनुष्य सुखी आहे किंवा नाहीं हें तो मेल्याच्या पूर्वी मला सांगवत नाहीं. हें ऐकिल्यावर खुसरूस त्याची दया येऊन व इहलोकींच्या संपत्तिवगैरे सर्व गोष्टी आडवावरच्या पाण्याप्रमाणें आहेत, त्या केव्हां जातील ह्याचा निश्चय नाहीं, असें त्यास वाटून त्यानें कीजसास चितेवरून काढण्याचा हुकूम केला आणि पुढें त्याच्या मरणापर्यंत त्याची मोठी मानमान्यता ठेविली. ह्या प्रकारें सोलनास आपले एके शब्दानें एका राजाचा प्राण वांचविल्याचें व एकास फार चांगला बोध केल्याचें यश आलें.

खुसरूनें लिडियांतील लोकांस आपल्या अमलांत आणिलें हें वर्तमान आयोनियांतील लोकां

स समजतांच त्यांनीं **सारडीस** शहरांत **खुसरू** हो ता तेथें वकील पाठवून असें बोलणें लाविलें कीं, जर **लीडियन** लोकांप्रमाणें आह्मांस तुह्मी आपल्या अम लाखालीं घ्याल तर आह्मीं खुषीनें येऊं, परंतु ही गोष्ट **खुसरूनें** मान्य केली नाहीं. कारण कीं, **लीडिया** जिंकण्याचे पूर्वीं त्या लोकांनीं आपला पक्ष स्वीकारावा ह्मणून त्यानें त्यांस बहुत सामोपचारांच्या गोष्टी सांगि तल्या होत्या परंतु त्यांनीं त्या ऐकिल्या नाहींत ह्मणून त्या स त्यांचा मोठा राग आला होता. तुह्मास आतां आमच्या अमलांत येण्यास फार अवकाश नाहीं हें त्यांस सुचवि ण्याकरितां त्यानें त्या वकीलांस एक गोष्ट सांगितली. ती अशी कीं, एके पारध्यानें हरणें जवळ यावीं ह्मणून बहुत वेळ मधुर मधुर वाद्यें वाजविलीं, पण तें सर्व व्यर्थ जाऊन त्यास त्यांना पाश लावून धरणें अवश्य पडलें. ह्यानंतर **खुसरूनें** त्यांस माघारे जाण्याचा हुकूम केला. तेव्हां आपलें बोलणें **खुसरू** ऐकत नाहीं असें पाहून त्यांनीं आपलें संरक्षण करण्याकरि

तां लासिडिमोनियन लोकांकडे साहाय्य मागावयास पाठविलें. त्यावरून लासिडिमोनियन लोकांनीं वकिलांचे हातीं खुसरूस सांगून पाठविलें कीं, तुह्मीं ग्रीक लोकांस उपद्रव दिल्यास आमचे कामास पडणार नाहीं. हा त्यांचा निरोप ऐकून खुसरू खदखदां हांसला, आणि त्याच वकीलाबरोबर त्यानें उलटा निरोप पाठविला कीं, आपण आपलेंच राज्य संभाळण्याची तजवीज नीट ठेवावी ह्मणजे झालें.

एशियामाइनराच्या किनाऱ्याजवळ जीं बेटें होतीं त्यांस खुसरूचें किमपि भय नव्हतें. कारण कीं, त्यांस फिनीशियन लोकांचें पाठबळ होतें व त्या लोकांस खुसरूनें अद्यापि जिंकलें नव्हतें व ह्या खेरीज त्यांजवळ आरमारही अगदीं नव्हतें.

## अध्याय ७

## खुसरूनें बाबिलनास

### वेढा पाडूननें जिंकिलें त्याविषयीं.

यूफ्रेटीस नदीपासून इंडियन समुद्रापर्यंत

जे देश होते ते आपल्या हस्तगत होत तोंपर्यंत खुसरू एशियामाइनरांत राहिला. त्यानंतर सिरीया व आर्बस्थान ह्या देशांत जाऊन ते त्यानें काबीज केले. मग बाबिलन शहर घेण्याकरितां आसीरिया देशांत आला. त्या शहरांतील लोकांप्रमाणें त्यास दुसऱ्या कोणत्या शहरांतील लोकांनीं त्रास दिला नव्हता. त्या शहरास वेढा घालून घेणें हें काम फार कठीण होतें. कारण, त्यांत फौज फार होती, व त्याचे तट फार उंच होते. ह्या शिवाय त्यांत वीस वर्षेपर्यंत पुरवयाजोगतें धान्य होतें तथापि तें शहर घेण्याची खुसरूची उमेद खचली नाहीं. हल्ला करून हें शहर आपल्या हातीं लागेल अशी आशा करणें व्यर्थ आहे असें वाटून त्यानें तें शहर धान्यादिकांचा तोटा पाडून घेण्याचा आव घातला. ह्याकरितां त्यानें त्या शहरा भोंवताला मोठा खोल खंदक खंदला व तटबंदी केली आणि आपल्या सैन्यास फार श्रम पडूं नये ह्मणून त्यानें सैन्याच्या बारा टोळ्या केल्या आणि खंदकाच्या संरक्षणाकरितां एके-

कीस एकेक महिना नेमून दिला. इकडे आपल्याजवळ धान्यादिकांची सामग्री विपुळ आहे व आपल्या शहराची तटबंदी खंबीर आहे ह्याकरितां आपणास खुसरूपासून कांहीं भय नाहीं असें शहरांतील लोकांस वाटून ते शहराच्या तटावर उभे राहून खुसरूची निर्भर्त्सना करीत, व त्याचे सर्व श्रम व्यर्थ जातील असें समजून त्यास हांसत.

खंदकाचें काम पुष्कळ दिवस चाललें होतें तें संपलें सें पाहून आपल्या मनांत जो मोठा बेत योजिला होता तो कोणत्या रीतीनें सिद्धीस न्यावा ह्याविषयीं तो मोठ्या गंभीरपणानें विचार करूं लागला. तो बेत त्यानें अगोदर कोणास कळविला नव्हता. मग लवकरच तो बेत सिद्धीस नेण्याकरितां त्याला जशी संधि पाहिजे होती तशी ईश्वरकृपेनें प्राप्त झाली. खुसरूस अशी बातमी कळली कीं, अमुक दिवशीं बाबिलनांत एक मोठा उत्साह होत असतो व त्या दिवशीं बाबिलनांतील लोक मद्यपानांत व खाली खुशालींत सर्व रात्र घालवितात.

**खुसरूस** ही बातमी लागल्यावर त्यानें आपल्या सैन्याची एक टोळी ज्या ठिकाणीं नदी शहरांत शिरते तेथें ठेविली व दुसरी एक टोळी ज्या ठिकाणापाशीं ती नदी शहरांतून बाहेर पडत असे तेथें ठेविली. आणि ह्या दोन्ही टोळ्यांस असा हुकूम केला कीं, आज रात्रीं नदीला उतारा झाला न झाला असें तुमच्या दृष्टीस पडल्याबरोबर तुह्मीं नदीच्या मार्गानें शहरांत शिरावें. नंतर आपल्या सरदारांस जे हुकूम देणें आवश्यक होते ते त्यांस देऊन सांगितलें कीं, आज देव आपल्या बऱ्यावर आहेत. आज आपली कार्यसिद्धि निश्चयें होईलसें वाटतें. मग त्यानें संध्याकाळीं आपल्या लोकांकडून शहराच्या दोन्ही बाजूंस नदी फोडून सर्व पाणी वर सांगितलेल्या खंदकांत जाईसें केलें. ह्या योगानें **यूफ्रेटीस** नदीचें पाणी तत्काळ उतरून तिचें पात्र कोरडें झालें. असें होतांक्षणींच वर सांगितलेल्या दोन्ही टोळ्या नदीच्या मार्गें शहरांत शिरल्या. ह्यापैकीं एक टोळीचा अधिकारी **गेब्रीयस** होता व दुसरीचा **गाडात**

स होता. त्या टोळया शहरांत शिरल्या तेव्हां त्यांस कोणीं प्रतिबंध केला नाहीं. त्यादिवशीं शहरांत जो मोठा उत्साह चालला होता त्याच्या गर्दीत नदीच्या घाटाचे दरवाजे लावावयाचे राहिले होते. ते दरवाजे पितळेचे होते व ते इतके मजबूद होते कीं, ते जर बंद असते तर खुसरूचा सर्व बेत व्यर्थ गेला असता. असो, मग त्या दोन्ही टोळयांस कोणापासून प्रतिबंध न होतां त्या संकेताप्रमाणें राजवाडयापाशीं जाऊन एकमेकींस मिळाल्या आणि पाहारेकऱ्यांवर एकाएकीं पडून त्यांनीं त्यांचे तुकडे तुकडे करून टाकले. वाडयामध्यें जी मंडळी होती तींतून कितीएकांनीं बाहेर गलबला कसला चालला आहे हें समजण्याकरितां दरवाजा खुला केला. तेव्हां इराणी लोक तत्काळ आंत शिरले आणि त्यांनीं तो वाडा सर केला. इतक्यांत तेथें राजा बेल्शाझर होता, त्यासजितके मनुष्य सांपडले तितके घेऊन तो तरवारी उपसून शत्रूंच्या अंगावर धांवला, पण त्याचे व त्याच्या बरोबर जे लोक होते त्यांचे इराणी लो

कांनीं तुकडे करून टाकिले. हें शहर ह्याप्रमाणें खुसरूनें घेतलें.

## अध्याय ८

## बाबिलन शहर घेतल्या

### वर ज्या गोष्टी झाल्या त्यांविषयीं.

मागें सांगितल्याप्रमाणें **खुसरूनें बाबिलन** शहर हस्तगत करून घेतल्यानंतर त्यानें जे लोक रस्त्यांत सांपडले ते मारले, आणि शहरांत हुकूम फिरविला कीं, ज्याच्या जवळ जीं हत्यारें असतील तीं त्यांनीं नव्या सरकारास आणून द्यावीं, आणि कोणी आपल्या घरांतून बाहेर निघूं नये. दुसरे दिवशीं सकाळीं किल्ल्यांतील लोकांस शहर **खुसरूच्या** हातीं लागलें व आपला राजाही मारला गेला, अशी बातमी कळतांच त्यांनीं किल्ला **खुसरूच्या** स्वाधीन केला. ह्याप्रमाणें **खुसरूस** त्या काळीं जगांत अत्यंत मजबूद असें जें **बाबिलन** शहर तें प्रायः लढाई केल्यावांचून मिळालें. हा लोकोत्तर जय प्राप्त झाल्यावर **खुस**

रूनें ह्या प्रसंगीं आपणास देवांनीं यश दिलें असें मानू न त्याबद्दल त्यांची स्तुति वगैरे करून त्यांस बळी दिले. ह्यानंतर त्यानें एक मोठी सभा केली तीमध्यें मोठे मोठे सरदार बोलाविले होते. मग सर्व लोकां समक्ष त्या सरदारांचें चातुर्य, शौर्य, राजभक्ति, इत्यादि उत्तम गुणांची मोठी वाहावा करून सैन्यांतील सर्व लोकांस त्यांच्या योग्यतेनुसार बक्षिसें दिलीं. नंतर त्यानें सर्व लोकांस सांगितलें कीं, आपणास जें आज मोठें वैभव प्राप्त झालें आहे त्याचें संरक्षण करण्याचा एवढाच उपाय आहे कीं, आपण आजपर्यंत ज्या सदाचरणानें चालत आलों, त्याच प्रमाणें पुढें चालावें. जय प्राप्त झाला असतां सुखोपभोगांत काळ घालवणें ही कांहीं योग्य गोष्ट नव्हे. शत्रूला बाहुबलानें जिंकलें असतां आपण स्वतः विषयजित होणें हें मोठें लज्जास्पद आहे. इतक्या दिवस आपण जें नांव मिळवलें तें राखण्याकरितां आपण आपल्या देशांत ज्या रीतीनें वागत होतों त्याच रीतीनें बाबिलन शहरांत वागावें हें

आपणांस उचित आहे. ह्याकरितां आपण आपल्या मुलांना सुशिक्षा लावण्याकडे विशेष लक्ष द्यावें, आणि हा उद्देश सिद्धीस नेण्याकरितां आपणांस स्वतः लक्ष देऊन वागावें लागेल, तेणेंकरून आपल्या सदाचरणाची वृद्धि होईल. ज्यागोष्टींकडून सदाचरणाची वृद्धि होईल त्याच गोष्टी मुलांपुढें आपण केल्या व त्यांस सांगितल्या असतां त्यांचीं अंतःकरणें बहुतकरून बिघडणार नाहींत, व ते सर्वदा स्तुत्य व प्रतिष्ठादायक अशाच कामांत आपला वेळ घालवतील.

**खुसरूनें** आपल्या सैन्यांतील ज्यांच्या अंगीं जें काम करण्याजोगे गुण व बुद्धि होती. त्यांस तीं तीं कामें सांगितलीं. परंतु सैन्यावरचे मुख्य अधिकारी, मांतोमांतीचे सुभेदार, मुत्सद्दी व वकील इत्यादि मोठेमोठे कामगार तयार करून त्यांच्या नेमणुका करण्याचें काम त्यानें आपणाकडे ठेविलें होतें. कारण, त्याचें मत असे होतें कीं, मोठेमोठे कामगार तयार करणें हेंच राजाचें मुख्य काम आहे व येणेंकरून

राज्य कारभार चांगला चालून प्रजेस सुख होतें, व लोकांमध्यें स्वस्थता राहून राज्याची कीर्ति दिगंतरीं जाते. कोणाच्या आंगीं काय गुण आहे हें सोधून काढणें हा गुण खुसरूच्या आंगीं विलक्षण होता, तेणेंकरून मनुष्यांच्या योग्यतेनुसार त्यांस कामें व अधिकार देऊन त्यांच्या कल्याणांत लोकांचेंही कल्याण होईल असें तो करी. त्यास उदाहरण, कोणत्याही कामावर योग्यमनुष्याची नेमणूक झाली ह्मणजे त्यास जो दरमाहा वगैरे मिळतो तेणेंकरून त्याचें कल्याण होतें व तो तें काम फार हुशारीनें, निःपक्षपातानें व नेकीनें करितो तेणेंकरून प्रजेचेंही कल्याण होतें. अशा रीतीनें त्यानें सर्व राज्यांतील सर्व हुद्दे यथायोग्य मनुष्यांस देऊन आपलें राज्य सुरळीत चालेसें केलें. ह्या खेरीज त्यानें राज्यांत अशी व्यवस्था केली कीं, दरएकप्रांतांत मामलेदार वगैरे कामगार नेमले व दरएकप्रांतांतील कामगारांवर देखरेख करण्याकरितां कांहीं हुद्देदार नेमले होते. ह्याप्रमाणें एकापेक्षां एक वरिष्ठ असे होतां होतां शेवटीं सर्वांवर आप

ला अधिकार ठेविला होता. आणि आपण आळसामध्यें वेळ न घालवितां सर्व कामें यथास्थित चालतात किंवा नाहीं ह्यावर तो बरोबर नजर ठेवी. आणि जसा शरीरांत आत्मा असला ह्मणजे त्याच्या योगानें शारीर व्यापार यथास्थित चालतात, तसा खुसरूच्या योगानें सर्व राज्याचा कारभार चालत होता. येणें करून कोणावर जुलूम न होतां जसा पिता पुत्रावर अधिकार करून त्याचें कल्याण करितो, त्याप्रमाणें आपल्या प्रजेवर अंमल करून खुसरू त्याचें कल्याण करिता झाला.

खुसरूनें प्रांतोप्रांतीं सुभेदार नेमले तेव्हां त्यानें अशी तजवीज ठेवली कीं, ज्या प्रांतांत बंदोबस्त राखण्याकरितां जें सैन्य ठेवलें होतें त्याच्या अधिकाऱ्यांवर त्या सुभेदाराचा अंमल ठेवला नाहीं. त्या सर्व अधिकाऱ्यांवर त्यानें आपलाच अंमल ठेविला होता. आपल्याशिवाय दुसरे कोणाचा अधिकार ठेवला नाहीं. तेणेंकरून असें होई कीं जर एकादा सुभेदार आपल्या संपत्तीच्या किंवा अधिकाराच्या बळानें उन्म

न होऊन लोकांवर जुलूम करूं लागला, तर त्याच्या अपराधाबद्दल त्यास शिक्षा करण्यास मनुष्यें त्याच प्रांतांत असत. कोणत्याही मनुष्याच्या हातीं सर्व मुखत्यारी असूं नये ह्याविषयीं **खुसरू** फार जपत असे. कारण एकाच्या हातीं निष्प्रतिबंध अधिकार असला तर तो कदाचित् आपल्या हाताखालच्या कामगारांस त्रास देईल आणि तेणेंकरून राज्यास धोका येऊन तें आपणास पश्चात्तापाचें कारण होईल असें त्यास वाटत असे.

ह्याप्रमाणें **खुसरूनें** दिवाणी मुलकी व लष्करी तीन्ही कामांचा विलक्षण बंदोबस्त ठेवला होता. प्रत्येक प्रांतांत त्याचे मोठे विश्वासू मनुष्य असत, ते तेथें जें जें होई तें तें त्यास यथास्थित लिहून पाठवीत. जे कामगार नेकीनें वागून किंवा दुसऱ्या कोणत्याही सद्गुणाच्या योगानें प्रसिद्धीस येत त्यांचा तो फार मान ठेवी व त्यांस इनामें वगैरे देई. शौर्यापेक्षां दया हा गुण मोठा आहे असें त्यास वाटत असे. तो ह्मणे कीं,

शौर्याच्या योगानें राष्ट्राचीराष्ट्रें धुळीस मिळून जातात परंतु दया ही लोकांच्या कल्याणास फार उपयोगी पडते. चांगल्या कायद्यांच्या योगानें लोकांस चांगल्या रीतीभांती लागतात ही गोष्ट त्याच्या मनांत येई, पण त्याचें मत असें असे कीं, राजाचें आचरण हाच कायदा असावा, ह्मणजे राजाचें आचरण निर्दोष असावें. ह्या खेरीज त्याचें ह्मणणें असे कीं, ज्यांच्यावर आपण अंमल करितों त्यांच्यापेक्षां आपल्या ठायीं ब्राह्मणपणा व सद्गुण अधिक असले पाहिजेत. नाहीं तर आपण त्यांवर अधिकार करण्यास योग्य नाहीं. मुत्सद्दी वगैरे जे लोक आपल्याकडे येतात त्यांनीं आपला मान ठेवावा ह्याविषयीं उत्तम युक्ति हीच होय, कीं आपण त्यांचा सन्मान ठेवावा. ह्मणजे त्यांच्या समक्ष राजानें अयोग्य भाषण किंवा वेडेचार करूं नयेत अशी त्याची पक्की खात्री होऊन गेली होती.

औदार्य हा गुण राजाचे ठायीं अवश्य असावा. हा राजाचा गुण चांगला असें खुसरूस वाटत असे.

लोकांस धन देण्यानें आपणास जसा आनंद होतो. तसा धन जवळ असून दुसरे कशानेंही होत नाहीं. खुसरू आपल्या मुत्सद्दी लोकांस असें ह्मणत असे कीं, मजवळ बहुत पैसा आहे हें सर्व लोकांस माहित आहे, येणेंकरून मला फार संतोष वाटतो, परंतु हा पैसा माझाच आहे असें मी ह्मणत नाहीं, तुमचाही आहे. कारण, हा इतका पैसा कायमीं आपल्या ऐष आरामा करितां खर्चण्यास्तव जमविला आहे ? नाहीं नाहीं, अशी गोष्ट कधीं होणार नाहीं. मी इतका पैसा जमविला आहे ह्याचा मुख्य उद्देश हाच आहे कीं, जे मनुष्य माझी चाकरीने कीनें करतील त्यांस बक्षीस देण्याची शक्ति माझ्या आंगीं असावी आणि जे कोणी येऊन आपल्या अडचणी मला सांगतील त्यांच्या त्या दूर करतां याव्या ह्मणून मीं हा जमविला आहे.

एके दिवशीं कीजसानें खुसरूस असें ह्मटलें कीं, आपण अशीं जीं हीं बक्षिसें देतां तेणेंकरून एकादे दिवशीं आपल्या जवळ पैसा नाहीं सा होईल. आपण जर आजपर्यंत व्यवस्थेनें वागलां असतां तर आपणाजवळ अपार द्रव्य होऊन भूतळावरील सर्व ग

जांपेक्षां अधिक धनवान झालों असतां. हें ऐकून खुसरूनें कीजसास विचारिलें कीं असें केलें असतें तर मजवळ कितीबरें पैसा झाला असता? अमुक असें एके मोठे संख्येचें नांव कीजसानें घेतलें. नंतर खुसरूनें आपल्या दरबारांतील मानकरीलोकांस एक चिट्ठी लिहिली कीं, मला कांहीं पैशाची जरूर आहे तो तुह्मीं पाठवून द्यावा ते व्हां तत्काळ कीजसानें ज्या संख्येचें नांव घेतलें होतें तीपेक्षां अधिक पैशाची रास खुसरूपुढें मानकरीलोकांनीं केली. मग खुसरू ह्मणाला, कीजसा, हें पाहा माझें द्रव्य; आणि मी हें कोठे ठेवीत असतों असें ह्मणशील तर लोकांच्या अंतःकरणांत जी माझ्याविषयीं प्रीति आहे त्या प्रीतीरूप संदुकेमध्यें ठेवीत असतों.

खुसरू औदार्य हा गुण जरी फारचाहत असे तरी त्याहीपेक्षां कृपालुता, भूतदया, लीनता, हे गुण, ज्यांच्या योगानें लोकांचीं मनें मोहित होऊन त्यांची प्रितिजडते, ते त्यास फार उपयोगी वाटत असत. तो ह्मणे कीं,

राजा इतर मनुष्यांपेक्षां अधिक उदार असला तर त्यां त कांहीं मोठी गोष्ट झाली असें नाहीं. कारण, त्याच्याज वळ इतर मनुष्यांपेक्षां अधिक संपत्ति असते, परंतु रा जानें इतर मनुष्यांशीं बरोबरीच्या नात्यानें वागणें ही गोष्ट अत्यंत आश्चर्यकारक व लोकोत्तर आहे.

सर्व गोष्टींपेक्षां खुसरूचें मन देवाचें भजन पूजन करण्याकडे व धर्माचा मान राखण्याकडे वि शेष असे. ह्मणून **बाबिलनशहर** घेतल्यावर त्या चें सर्व काम संपून तो जेव्हां रिकामा झाला तेव्हां तो धर्मसंस्थापनेच्या तजविजीकडे लागला. देवाचें भज न पूजन करण्याकरितां व बळीवगैरे देण्याकरितां त्या नें प्रथमतः मेजाय ह्मणजे उपाध्याय नेमले. हीव्यव स्था **खुसरूच्या** मागें इराणी लोकांत फार दिव स चालली होती.

यथाराजा तथाप्रजा, राजाचें आचरण पाहून प्र जाही तसेंच आचरण करूं लागली, व सर्व लोकांचे स्व भाव त्याप्रमाणे झाले. **खुसरू** राज्य करूं लागल्यापा

सून त्यांची जी भरभर होत गेली तिचें कारण त्यांची देवनिष्ठा हेंच होय. असें दुराणी लोकांस वाटून आपलेंही कल्याण व्हावें ह्या बुद्धीनें ते मोठ्या मनोभावानें देवांची सेवा करूं लागले. ह्या खेरीज त्यांची अशी खात्री होऊन गेली होती कीं, खुसरूची कृपा संपादण्यास आपण देवांची सेवा करण्यामध्यें फार तत्पर आहों असें दाखविणें हाच एक निश्चित मार्ग आहे. लोकांची ही बुद्धि पाहून खुसरूस फार आनंद झाला. कारण, त्याच्या मनाचा निश्चय होऊन गेला होता कीं, जे लोक देवांचें भय बाळगतात व त्यांचें भजन पूजन करितात ते लोक राजाचा विश्वासघात करीत नाहींत, व त्यांची राजावर प्रीति असते, व सर्व लोकांचें कल्याण करण्याची त्यांची बुद्धि असते.

खुसरूनें बादिलन शहर आपलें मुख्य वास्तव्यस्थान करावें असा निश्चय केला, परंतु तें शहर मोठें मातबर होतें व तेथील लोकांची प्रीति त्यावर नादशा बसली नव्हती. ह्याकरितां त्यानें असा

विचार केला कीं, आपणास येथें पाहिल्यापेक्षां आपल्या जिवास विशेष जपलें पाहिजे. वाड्यांत असतां राज्यास मोठ्या दग्याच्या वेळा घडल्या ह्मणजे जेव्हां ते स्नान करितात, किंवा भोजन करतात, किंवा निजतात, त्या होत. ह्याकरितां ज्यांवर त्याचा पूर्ण विश्वास असे त्यां खेरीज त्यावेळेस दुसऱ्या कोणाला तो जवळ येउं देत नसे, आणि त्याची अशी समजूत होती कीं, इतका विश्वास ठेवण्यास खोज्यांप्रमाणें दुसरे कोणी योग्य नाहींत. कां कीं त्यांस बायका मुलें सोयरे धायरे कोणीच नसतात, व ह्या खेरीज लोक त्यांचा फार तिरस्कार करितात. यास्तव आपल्या धन्याची प्रीति जितकी आपल्यावर होईल तितकी करून घेण्यास ते फार तत्पर असतात. कारण, धन्यांच्या जिवावर त्यांची योग्यता संपत्ति वगैरे सर्व असतात. ह्याकरितां ते आपल्या धन्यास फार जपतात. ह्या समजुतीनें त्यानें घरगुती सर्व कामकारभार खोज्यांच्या हातीं दिले. ही चाल पूर्वी अगदीं नव्हती असें नाहीं, परंतु

खुसरूनें हिचा स्वीकार केल्यामुळें हिला विशेष दृढ ता येऊन आसीरियांतील सर्व राजांनीं तीउच लली.

हीचाल खुसरूच्या मागें रोमशाहरच्या बादशाहांनीं घेतली होती, व हे खोजे लोक बादशाहांचे मोठे प्यारे असल्यामुळें त्यांच्या राज्यांत त्यांचें मोठें प्राबल्य असे. हें प्रसिद्ध आहे. व अशी गोष्ट झाली ह्यांत मोठा चमत्कार वाटणें नलगे. कांकीं, बादशाह आपले जीव त्यांच्या विश्वासावर टाकीत आणि त्यांस त्यांच्या विश्वासूपणाचा, राजभक्तीचा, व प्रमाणिकपणाचा अनुभव आल्यावर त्या बादशाहांनीं राज्यांतले कांहीं हुद्दे त्यांच्या हातीं दिले. आणि होत होत ते अगदीं त्यांच्या स्वाधीन झाले. ह्यांत कांहीं मोठें नवल नाहीं. हे खोजे खुशामतीच्या कामांत मोठे हुशार असत, आणि बादशाहा दरबारांत असले ह्मणजे ते मोठ्या प्रौढतेनें बजपून वागत. मग ते अंतःपुरांत येऊन आपला बादशाहीचा डामडौल एकीकडे ठेवून ह्या लोकांशीं ब

रोबरीनें बोलूंचालूं लागलेअसतां त्यारवुशाखीच्या वे ळांत आपलें एकादें काम कसें साधून घ्यावें हें त्यां रवो ज्यांस फार चांगलें माहीतअसे, अशा हिकमतीनें ते आपल्या यजमानांचें मन वश करून घेत, व त्यांचा पूर्ण विश्वास संपादीत. तेणेंकरून सहजच त्यांचें दरबारांत मोठें वजन असे, व सरकारीकामें त्यांच्या हातून सहज होत, व कोणास थोर कामें किंवा मोठमो ठल्ले किताब देणें तेंत्यांच्या हातांत असे, व त्यांस स्व तांही मोठ मोठालीं कामें व अधिकार सहज मिळत.

परंतु शिकंदार बादशाहा व "रोम शहरचा बादशाहा" सेवेरस" इत्यादि सूज्ञ पुरुष रवोज्यां चा फार त्रासकरीत. ते असें समजत कीं, हे खोजे केव ळ संपत्तीचे दास व लोककल्याणाचे शत्रु होत. त्यांचा मुख्य उद्देश म्हटला म्हणजे राजाचें मन स्वाधीन करू न घ्यावें आणि त्यास राज्यकारभाराविषयीं जितकें अ ज्ञानी राखवेल तितकें राखावें व वास्तविक योग्यपुरु षांचा राजापाशीं शिरकाव होऊं देऊंनये. त्याचीआ

पणापैकीं दोघांचौघांखेरीज दुसऱ्या कोणाशीं सलगी होऊं देऊं नये हा आहे. सारांश राजा आपल्या मुठींत जितका राहील तितका ठेवण्याविषयीं त्यांचा निरंतर प्रयत्न असतो.

ह्याप्रमाणें राज्यांतील सर्व खात्यांचा बंदोबस्त केल्यानंतर खुसरूनें असा बेत केला कीं, आपण मोठ्या स्वारीनिशीं शहरांतील देवांच्या दर्शनास जावें व त्यावेळीं मोठ्या समारंभानें आपल्या नव्या व जुन्या प्रजेच्या दृष्टीस पडावें. ह्या प्रसंगीं त्याचा उद्देश मोठें वैभव दाखवून लोकांचे मनाचें आकर्षण करून त्यांस दिपवून टाकावें असा होता.

आजपर्यंत सद्गुण प्रदर्शन करूनच खुसरू लोकांच्या मनांत आपणाविषयीं पूज्यत्वबुद्धि उत्पन्न करीत आला. परंतु ह्या प्रसंगीं संपत्तीचा मोठा डामडौल दाखवून ती बुद्धि त्यांचे ठायीं उत्पन्न करावी असा त्याच्या मनानें कल घेतला. असो, ह्यानें आपल्या व आपल्या संकेतसाह्यकारी राजांच्या मुख्यमुख्य मानकऱ्यांस ह्या

समारंभांत आपल्या बरोबर असण्याविषयीं हुकूम केला व त्यांस भेद्री लोकांप्रमाणें पायघोळ झगे घालावयास दिले. हे झगे नानाप्रकारच्या उत्तम उत्तम रंगाचे कापडांचे होते व त्यांवर कलाबतूचा करीदा काढलेला होता तेणेंकरून ते फार लकाकत व शोभायमान दिसत. त्या खेरीज त्या मानकरी लोकांच्या हाताखालीं जे कामगार होते त्यांस देण्याकरितां त्या मानकऱ्यांजवळ त्यानें झगे दिले होते ते झगे मानकरी लोकांच्या झग्यांपेक्षां कांहीं कमी किमतीचे होते. इराणी लोकांनीं भेद्री लोकांप्रमाणें पोषाक आजच केला व डोळे फार पाणीदार दिसावे ह्मणून त्यांनीं डोळ्यांत सुरमाही घातला व आपले चेहेरे मोठे तेजस्वी दिसावे ह्मणून ते रंगिवले.

ज्या दिवशीं हा समारंभ करण्याचें ठरलें होतें त्या दिवशीं प्रातःकाळीं सर्व मंडळी राजवाड्याजवळ जमली. मग खुसरूची स्वारी निघाली. ती अशी कीं, आघाडीस आठ हाजार पायदळ होतें. त्यांच्या तीन टोळ्या होत्या. त्या अशा कीं एक हजारांची एक टोळी मध्यें

असून दुसऱ्या दोन टोळ्या दोन दोन हजारांच्या दोहों बाजूंस होत्या. एकेका टोळींत चारचार रांगा होत्या पायदळापाठीमागून स्वार चालत होते. इराणी लोकांचे स्वार उजव्या बाजूस होते व डाव्या बाजूस संकेत साह्यकारी लोकांचे स्वार चालत होते. त्याप्रमाणेंच रथ ही दोन्ही बाजूंस चालत होते त्यानंतर राजवाड्याच्या दरवाज्यांतून बैल निघाले तेही रांगांनी चालविले होते. एकेका रांगेंत चारचार बैल होते. हे बैल मेजाय सांगतील त्याप्रमाणें संस्कार करून जुपिटर वगैरे देवांस बळी देण्याकरितां नेले होते. बैलांपाठीमागें सूर्याला जे घोडे बळी द्यावयाचे होते ते चालविले होते. व त्यांच्या पाठीमागें एक शुभ्ररथ चालविला होता, त्यावर फुलांच्या माळा घातल्या होत्या व त्याचा ध्वज सोन्यानें मढविला होता हा रथ जुपिटर नामक देवास वाहावयाचा होता. त्या रथाच्यामागें त्या सारखाच एक शुभ्र व सुशोभित असा दुसरा रथ सूर्यास वाहण्याकरितां चालविला होता. व त्याच्या पाठीमागून एक तिसरा रथ येत

होता. त्या रथाच्या घोडयांच्या पाठीवर तांबडयारंगाचे गा
ते घातले होते आणि त्याच्या पाठीमागून एक मोठें अग्नी
चें कुंड घेऊन लोक चालले होते. त्या सर्वांच्या मागून खु
सरू रथांत बसून चालला होता त्याच्या डोक्यावर रत्न
जडीत मुगूट होता व आंगांत अस्मानी रंगाचा झगा हो
ता. त्या रंगाचा झगा राजे लोकमात्र घालीत असत. खु
सरूच्या आंगावर जांभळ्यारंगाची शालजोडी होती. खु
सरू ज्या रथांत बसला होता त्यांतच घोडे स्वारांचा ना
यक अमलशा सरवल जागीं बसला होता. तो चांगला
देखणा होता, परंतु खुसरू इतका उंच नव्हता तेणें
करून खुसरू फारच शोभत असे. लोकांनीं खुस
रूस पाहतांच त्याला साष्टांग नमस्कार घालून त्याची
पूजा केली. आपली पूजा करण्याकरितां खुसरूनें
कांहीं अंतरावर थोडेसे लोक उभे करून ठेविले होते.
त्यांस पूजा करतांना पाहून सर्व लोकांनीं त्याची पूजा
केली. किंवा हा मोठा समारंभ पाहून ते चकित झाले
आणि त्याची पूजा केली. हें बराबर समजत नाहीं. दु रा

णी लोकांनीं आजपर्यंत अशीकधीं खुसरूची पूजा केली नव्हती.

देवांस बळी देण्याचीं कांहीं ठिकाणें होतीं तेथें ते येऊन पोहोंचल्यावर त्यांनीं प्रथमतः जुपिटरास बळी दिला. नंतर एक सूर्यास दिला. "जुपिटर" ह्यास जो बळी दिला, तो बैलांचा होता, व सूर्यास जो दिला तो घोड्यांचा होता, व "मेजाय" लोकांच्या चालीप्रमाणें कांहीं बळी भूमी देवीसही दिले व कांहीं सिरिया देशांतील ग्रामदेवतांस दिले. मग हें अनुष्ठान झाल्यानंतर लोकांस मौज वाटावी ह्मणून खुसरूनें घोड्यांच्या रथांच्या शर्यती लावल्या, व असेच नानाप्रकारचे खेळ करविले आणि असें करून समारंभ संपविला. हे खेळ करण्याकरितां एक मोठी जागा नेमली होती व तेथें सुमारें एक कोसाचा शर्यतीकरितां टप्पा केला होता. व तेथें निरनिराळ्या देशाचे लोक आले होते, त्यांनीं त्यांस शर्यत वगैरे करणेंती आपल्या देशाच्यालोकांशीं करावी व असक्यादेशाचे लोकांनीं शर्यत किंवा अमुक डाव जिंक

ला असतां त्यांस अमुक बक्षीस द्यावें असें ठरविलें होतें. इराण देशांतल्या घोड्यांच्या शर्यती लागल्या असतां खुसरूनें स्वतः कांहीं शर्यती जिंकल्या. कां कीं, त्या वेळीं त्यासारखा वस्ताद घोड्यावर बसणारा दुसरा कोणी ही नव्हता. रथांच्या शर्यतींचा असा नियम होता कीं, दोहोंची मात्र शर्यत लावावी अधिकांची लावूं नये.

ह्या प्रकारची स्वारी काढण्याची रीति खुसरू मागें इराणी लोकांमध्यें फार दिवस चालत होती, परंतु बळी दिले ह्मणून जें वर सांगितलें तसे बळी मात्र पुढें देत नसत. असो. खुसरू ज्या समारंभानें बळी द्यावयास गेला होता त्याच समारंभानें परत आला. कांहीं दिवसानीं पुढें खुसरूनें घोड्यांच्या शर्यतींत जय मिळविल्या बद्दल आनंदानें एक मोठी मेजवानी दिली. त्या मेजवानीस त्याचे स्वकीय इराणी व मेदी लोक असून दुसरे पुष्कळ लोक ही आले होते. त्या मेजवानींत त्यांनीं जसा थाट पाहिला तसा पूर्वी कधीं ही पाहिला नव्हता. जेवणाचा समारंभ झाल्यानंतर त्यानें

सर्वांस उत्तमप्रकारचे पोषाक व दागिने वगैरे बहुत देणग्या दिल्या तेणेंकरून ते सर्व लोक सानंद होत्सा- ते खुसरूचे उपकार स्मरत व गुणानुवाद करी- त आप आपल्या घरीं गेले. हा एवढा सार्वभौम रा- जा असतांही सर्व मंडळीस पोहोंचविण्याकरितां द- रवाजापर्यंत आला होता. आणि असें करण्यांत आप ले भविष्यंत किमपि हानि आहे असें त्यास वाटलें नाहीं. त्याप्रमाणें प्राचीन लोकांच्या चाली होत्या. मनुष्यास प्राप्य जें अत्यंत श्रेष्ठ वैभव तें व अत्यंत लीनताही आंगीं कशी राखावी हें त्या काळच्या पुरुषांस फार चांगलें ठाऊक होतें.

## अध्याय ९

खुसरूनें बाबिलन शहर घेतलें त्या वेळेपासू न त्याच्या मरणकाळपर्यंत इतिहास.

बाबिलन शहर घेतल्यानंतर सर्व एशि या खंड आपल्या हातीं आलें असें समजून खुस रूनें इतर दिग्विजयी पुरुषांप्रमाणें वर्तन केलें

नाहीं. ते बहुधा विषयलंपट व मिजाशी होऊन आ
पल्या संपादिलेल्या कीर्तीस कलंक आणितात. ते अ
सें ह्मणतात कीं, आह्मी आजपर्यंत बहुत श्रम भो
गले व हाल काढले. आतां बाकीचें आयुष्य सुखो
पभोगांत घालविण्यास चिंता नाहीं. **खुसरूची** अ
शी समजूत होती कीं ज्या मार्गानें आपण इतकी कीर्ति
संपादली त्याच मार्गानें तिचें संरक्षण करावें हा आप
ला धर्म होय. ह्मणजे आपण मोठ्या विवेकानें वागा
वें व परमेश्वरानें जें हें मोठें ऐश्वर्य आपणास दिलें
आहे त्याचें काम मोठ्या श्रमानें व लक्ष लावून करावें.

**बाबिलन** शहराची यथास्थित व्यवस्था झा
ली असें **खुसरूस** वाटल्यानंतर तो **इराण** देशा
स परत जाण्यास निघाला. जातांना आपल्या मामा
स भेटावें ह्याकरितां तो **मेदी** देशांतून गेला आणि
त्यास बहुत नजरा देऊन त्यानें सांगितलें कीं, जेव्हां
आपल्या मर्जीस येईल तेव्हां आपण **बाबिलन**
शहरास जावें. तेथें आपणाकरितां मोठा वाडा तयार

करून ठेविला आहे. हें शहर आपलें असें समजावें खुसरूनें हें सर्व राज्य जरी आपुल्या बाहुबलानें संपादिलें होतें तरी जोंपर्यंत त्याचा मामा जिवंत होता तोंपर्यंत त्याच्या व आपल्या नावानें तो राज्य चालवीत असे. त्यानें त्याची मर्यादा इतकी ठेविली होती कीं राज्यकारभारांतील मुख्य मुख्य अधिकार त्यानें त्याकडे ठेविले होते. पुढें खुसरू जेव्हां पुनः बाबिलनास गेला तेव्हां तो सियाक्सरीसास बरोबर घेऊन गेला.

ते दोघे बाबिलनास येऊन पोहोंचल्यावर त्यांनीं सर्व राज्याचा कारभार कसा काय चालवावा ह्याविषयीं एकमेकांच्या संमतानें येणेंप्रमाणें तजवीज योजिली. त्यांनीं सर्व राज्याचे १२० प्रांत केले आणि आपले हुकूम प्रांतोप्रांतींच्या कामगारांस लवकर पोहोंचावे ह्मणून त्यानें जागोजाग डांका बसविल्या. जासुदांचे जागीं घोडे तयार असत, व ते रात्रंदिवस चालत. ह्यामुळें ते एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं

फार जलद जात. ज्या मनुष्यांनी खुसरूस साह्य केलें होतें व जे त्याच्या उपयोगीं पडले होते त्या मनुष्यांस त्यानें ह्या प्रांतांतील सुभेदारीचीं कामें दिलीं व ह्या सुभेदारांवर देखरेख करण्या करितां त्यानें तीन सरसुभेदार नेमले असत त्यांनीं नेहमी राजसभेंत असत जावें व त्यांस सर्व सुभेदार आप आपल्या प्रांतांत जें काय होई तें नियमित काळीं लिहून कळवीत असत. व राजास कोणत्याही सुभेदारास कांहीं एकादा हुकुम पाठविणें झाल्यास तो ह्यांच्या द्वारें पाठवी. येणेंकरून सर्व सुभेदारांवर ह्या तिघांचा अमल राही, आणि सर्व राज्याचें काम ह्यांच्या हातून चाले.

खुसरू बाबिलन शहरास आला त्यावेळेस त्यानें असा हुकूम केला कीं, सर्व सैन्यानें येऊन बाबिलन शहरांत हजर व्हावें. त्या प्रमाणें सर्व सैन्य जमल्यावर त्यानें त्याची हजीरी घेऊन मोतदात करून पाहतां त्या वेळीं त्याजवळ १२०००० घोडे स्वार, ६००००० पायदळ, व २००० चाकास विळे लावलेले रथ इतके भरले

ह्यानंतर आपल्या मागें राज्याचा बंदोबस्त राहावा ह्मणून ठाण्याठाण्यास जितकी पाहिजे तितकी शिबंदी ठेवून बाकीच्या सैन्यानिशीं सिरिया देशांत गेला, आणि राज्यकारभाराचा बंदोबस्त केल्यावर त्यानें तांबडया समुद्रापर्यंत सर्व देश जिंकून आपल्या ताब्यांत आणले व आफ्रिका खंडांतील ही मिश्र देश वगैरे घेऊन आपल्या राज्याची हद्द हाफसी लोकांच्या राज्याच्या हद्दीस भिडवली.

ह्यानंतर सुमारें दोन वर्षांनीं खुसरूचा मामा "सीयाकुसरीस" मेदीया देशांत व खुसरूचा बाप "कंबायसीस" इराण देशांत मृत्यु पावले. तेणेंकरून मेदीया व इराण ह्या दोन्ही देशांचा खुसरू एकटा राजा झाला.

आतां खुसरूनें किती वर्षें राज्य केलें ह्याविषयीं भिन्न भिन्न मतें आहेत. सियाकुसरिसास साहाय्य करण्याकरितां तो इराणांतून फौज घेऊन मेदीया देशीं आला त्या वर्षापासून गणून ती

स वर्षें पर्यंत त्यानें राज्य केलें असें कित्येक ह्मणतात, व कोणी सियाक्सरीस व कंबायसीस हे मरण पावून खुसरूकडे जेव्हां सम्राट् ही पदवी आली तेव्हांपासून गणून सात वर्षें त्यानें राज्य केलें असें ह्मणतात.

## अध्याय १०

### खुसरूच्या राज्याची अखेर व त्याचा मृत्यु.

यावेळीं खुसरूच्या राज्याची पूर्वसीमा सिंधु नद होती. उत्तरेस व पूर्वेस कास्पियन समुद्र व तुर्क समुद्र हे होते. पश्चिमेकडील मर्यादा इजियन समुद्र होता व दक्षिणेस इथीओपीया देश व अर्बी समुद्र हे होते. ह्या विस्तीर्ण राज्याच्या मध्यभागीं तो राहत असे. हिवाळा आंत घेऊन सात महिने तो बहुत करून बाबिलन शहरांत राही. कां कीं, तेथील हवा ऊष्ण असे. व वसंतकाळीं सुमारें तीन महिने सुसा नामक शहरीं राही, आणि उन्हाळ्यांत दोन महिने एकबटाना नामक गावीं राही.

ह्या प्रमाणें सात वर्षे स्वस्थपणें राज्यसुखानुभव घेतल्या नंतर खुसरू इराण देशीं आला. त्याला सर्व राज्य प्राप्त झाल्यापासून स्वदेशी जाण्याची ही त्याची सातवी खेप. ह्यावरून असें स्पष्ट दिसतें कीं, तो दर वर्षी एक वेळ नियमानें इराण देशांत जात असे. ह्यावेळेस कैबायसीस मरून कांही वर्षे झालीं होतीं, व खुसरू ही स्वतः बराच वृद्ध झाला होता. त्याचें वय सुमारें साठ वर्षांचें होतें.

शेवटपर्यंत त्याची प्रकृति चांगली दृढ होती. हें तो सर्वदां आहारांत वगैरे नेमस्तपणा राखीत असे त्याचें फळ होय. जे विषय लंपट होतात व मद्यप्राशनादि दुष्ट व्यसनांच्या स्वाधीन होऊन जातात, त्यांस तरुणपणींच वृद्धपणची अशक्तता येते.

मग आपला अंतकाळ जवळ आला असें पाहून खुसरूनें आपलीं मुलें व राज्यांतील सर्व मुख्य मुख्य कामगार त्या सर्वांस आपणा जवळ बोलावून आणून त्यांच्या समक्ष देवांनीं इहलोकीं आपलें बहुतक

त्याण केलें ह्मणून त्यांचा स्तव केला व आपण प्रसन्न होऊन माझ्या मागें माझ्या मुलांचें व माझ्या देशाचें व माझ्या मित्रांचें संरक्षण करावें अशी त्यांची प्रार्थना केली. नंतर त्यानें सांगितलें कीं, माझ्या मागें माझा वडील पुत्र कंबायसीस त्यास राज्याच्या गादीवर बसवावें. व माझा धाकटा मुलगा ताने ओकसरीज त्यास अमुक अमुक सुभे द्यावे. हे सुभे मोठे मोठे व पुष्कळ होते. असो त्यानें ह्याप्रसंगीं दोन्ही मुलांस बहुत उत्तम प्रकारचा उपदेश केला व बहुत अमोलीक गोष्टी सांगितल्या. त्या अशा कीं राजाचें मुख्य बल व आधार हीं ह्मटलीं ह्मणजे राज्याचा मोठा विस्तार किंवा फौजेचा भरणा व अफाट संपत्ति हीं नव्हत, तर देवभक्ति, भावाबंदांत परस्पर स्नेहभाव, हीं दोन होत. व तिसरें एक आहे तें असें कीं, राजाच्या आंगीं खरे व इमानी मित्र मिळवण्याची व मिळाल्यावर राखण्याची कला अवश्य असली पाहिजे. खुसरू आपल्या मुलांस ह्मणतो, बाबानो, मला संतोष करावयाची जर

तुह्मास इच्छा आहे तर मी सांगतों ती गोष्ट लक्ष देऊन ऐका, आणि तीप्रमाणे वागा. पहिली गोष्ट अशी कीं, तुह्मी एकमेकांवर प्रीति करा. व लोकांची मर्यादा राखा. मरणानंतर मी दिसेना झालों ह्मणजे मी अगदीं नाहींसा झालों असें तुह्मांस वाटणार नाहीं, अशी माझी खात्री आहे. कांकीं, जी वस्तु दिसत नाहीं ती अगदींच नाहीं असें ह्मणणें हा अविचार आहे. पाहा बरें माझा आत्मा आजपर्यंत तुमच्या दृष्टीस कधींही पडला नाहीं तथापि तो पदार्थ वास्तविक आहे असें तुह्मी पक्केपणें जाणतां. मनुष्याचा आत्मा जर अनित्य असेल तर मनुष्य मरून त्याचें शरीर मातीस मिळालें असतां लोक त्याच्या संतोषार्थ श्राद्धादि कर्मे करितात तीं अगदीं करतेना. तस्मात देह हा आत्मा नव्हे, तो तदतिरिक्त पदार्थ आहे, असा सर्व मनुष्यांचा विश्वास आहे असें सिद्ध होतें. बरें आत्मा अनित्य आहे अशी जरी भ्रांति असली, आणि मी मेल्यानंतर माझे मागें कांहींच उरत नाहीं असें जरी वाटत असलें तरी तुह्मीं

देवांचें भय अवश्य धरलें पाहिजे. कांकीं, ते अजर व अमर आहेत व सर्व मनुष्यांचीं कर्मे त्यांस प्रत्यक्ष आहेत, व त्यांची शक्ति अगाध आहे. ह्याकरितां देवांचें भय मनीं बाळगा आणि तेणेंकरून धर्मविरुद्ध किंवा न्यायविरुद्ध कर्म करणें किंवा मनांतही आणणें ह्यापासून आपणांस दूर राखा. देवांच्या मागून लोकांचेंही भय बाळगा. देवांचे कृपेनें तुह्मांस मोठी पदवी प्राप्त झाली आहे, आणि तुह्मी न्यायानें जर वागून आपली वर्तणूक निर्दोष ठेवाल तर तुमची कीर्ति दिगंतरीं जाऊन तुह्मी मोठे बलाढ्य व्हाल. आतां मी मेलों ह्मणजे माझें शरीर सोन्याच्या रुप्याच्या किंवा दुसऱ्या कोणत्याही धातूच्या पेटींत घालून ठेवूं नका. तर ज्या मृत्तिकेपासून माझें शरीर निर्माण झालें तींतच पुरा. पृथ्वीजी जगन्माता तीस मिळून जाणें ह्यापेक्षां मला दुसरी कोणती गोष्ट आवडत नाहीं. ह्यानंतर त्यानें जे लोक जवळ होते त्यांनीं चुंबन करावें ह्मणून त्या काळच्या चालीप्रमाणें आपला हात पुढें केला आणि आपला अंतकाळ

समीप आला सा पाहून त्याणें आपल्या मुलांशीं असें भाषण केलें कीं, प्रियबाळांनों, मी आतां येतों, ईश्वर तुमचें कल्याण करो. तुह्मी आईस मी विचारलें आहे ह्मणून सांगा. आपले जे मित्र जवळ होते त्यांस असें ह्मणाला कीं, गड्यांनो, जे हल्लीं तुह्मी येथें आहां त्यांस व जे कोणी येथें नसतील त्यांस हा माझा शेवटचा सलाम आहे. व तुह्मा सर्वांचें देव कल्याण करो. असें भाषण करून त्यानें आपल्या तोंडावर पांघरूण घेतलें आणि प्राण सोडला.

ह्या राजाच्या मरणानें त्याच्या सर्व प्रजेस मोठा खेद झाला.

**समाप्त.**